अभिनव वाङमय माला पुष्प १ लें

# संगीत दाम्पत्य-रहस्य नाटक

मॉडर्न बुक डेपो,
पुणें नं. २.

सन किं० १ रुपाया [ १९३३

# लेखकाचे चार शब्द

आधुनिक दाम्पत्यांचें जीवनांत सुधारणा कशी करतां येईल याविषयीं डोक्यांत घोळत असलेले विचार संवादरूपांत अगदीं उघड्या भाषेंत येथें नमूद केले आहेत. हेच विचार अनेकांच्या डोक्यांत येऊन गेले असतील; याचप्रकारचे विचार कांहीं मासिकांतून छापून आलेलेहि वाचावयास सांपडले व त्यामुळेंच आपलीही 'विचार कंथा' छापावी असें मनानें घेतलें.

सदर 'विचारकंथेला' नाटक म्हणायचें ठरल्यावर नांव काय द्यावयाचें हा विचार पडला; एकदां 'वेणींतील गजरा' असे नांव द्यावे असे मनांत आलें पण तो विचार मागे पडला. विषय विविध मनोवृत्तींच्या दाम्पत्यांच्या भोंवती गुंतविलेला म्हणून 'दाम्पत्यरहस्य' हें नांव दिलें. यांतील विचार आंबट, तिखट, तेलकट व वेळीं तुरटही आहेत! याची लेखकाला जाणीव आहे.

यांत घातलेलीं जुनी गाणी, पदें, फक्त उल्लेखवजा आहेत. सदरच्या कर्त्यांचा लेखक ऋणी आहे. स्टेजवर नाटक आणावयाचे ठरल्यास हीच म्हटली पाहिजेत असे नाहीं. गायकाना आवडतील तींच गाणी व पदें त्यानीं म्हणावीं.

सं. श्रीमुखांत कर्ते य. गो. जोशी यानीं दिलेल्या सल्ल्याबद्दल लेखक त्यांचा आभारी आहे. आमचे मित्र श्री. नारायणराव भिडे यांनीं प्रकाशनाची जबाबदारी अंगावर घेतल्यामुळे हे धाडस केले आहे.

ज्ञानप्रकाशचे वयोवृद्ध संपादक श्री. बापूजी मार्तंड आंबेकर यानी

या माझ्या विचारकंथेला प्रस्तावना लिहून मला ऋणी केले आहे. मला काय म्हणावयाचे होते ते त्यानी प्रस्तावनेत स्पष्टपणे सांगितले आहे.

प्रत्येक विवाहीत मध्यमवयस्क व तरुण पुरुषाने हे पुस्तक आपल्या पत्नीस वाचून दाखवावे किंवा वाचण्यास द्यावे. भाऊबिजेला भावाने हे दाम्पत्यरहस्य बहिणीला जरूर भेट म्हणून द्यावे. ही विचारकंथा प्रत्येक विवाहीत स्त्रीच्या वाचण्यात यावी हाच हेतु हे पुस्तक लिहिताना होता व आहे.

या पुस्तकाची रंगावृत्ति अर्थात् काही भाग गाळून काही नवा घालून निराळी काढणार आहो. त्यासंबंधांत काहीं सूचना करणे, त्या लेखकाच्या पत्त्यावर कराव्या ही विचारकंथा लिहून काढण्यास अहमदाबाद येथे मार्चमध्ये सुरवात झाली. आज चार पाच महिने या विचारानी भंडावून सोडले होते. पुस्तक आता हातावेगळे झाल्यामुळे थोडे हायसे वाटत आहे.

आश्विन शु॥ १० विजयादशमी
शके १८५५
१२ बुधवार, पुणे.

विश्वनाथ गणेश ताम्हणकर

# संगीत दाम्पत्य-रहस्य नाटक.

## प्रस्तावना.

### लेखकः—श्री. बापुजी मार्तंड आंबेकर

हे नाटक माझे मित्र रा. वि. ग. ताम्हणकर यानीं लिहिले आहे. नाटकाचा संकल्पित विषय त्याच्या नांवावरूनच कळून येण्यासारखा आहे. स्त्री-पुरुषांचे वैवाहिक आयुष्य सुखांत जाण्यास कोणकोणत्या गोष्टी आवश्यक आहेत याचे निदर्शन करण्याच्या हेतूनेच रा. ताम्हणकर यांनीं हा प्रयत्न केला आहे. अशा प्रकारचा त्यांचा हा पहिलाच प्रयत्न होय. ही वस्तुस्थिति लक्ष्यांत घेतां कला या दृष्टीने त्यांच्या कृतीकडे पाहणे तितकेसें सफळ ठरणार नाही हे उघड आहे. कलेचें आविष्करण करण्यास विशेष अवसर, पात्राचा स्वभावविकास दाखविण्याचे कामीच असतो. पण अनेक साच्याचे सांसारिक नमुने पुढें मांडणें येवढेच प्रस्तुत नाटककारांचें उद्दिष्ट असल्यामुळें त्यांत व्यक्तीच्या स्वभावविकासास किंवा स्वभावपरिवर्तनास अवकाश मिळणे मूलतःच अनवश्यक झालें आहे. प्रस्तुत नाटकांत भिन्न भिन्न ध्येयांनीं प्रेरित झालेले असे वैवाहिक आयुष्यक्रम वाचकांपुढे मांडून त्यांतलि सरस नीरसता निदर्शित केली आहे. यामुळे नाटकाला एकसूत्री कथानकही लाभवून देण्याची नाटककारांना आवश्यकता वाटली नाहीं. त्यातलि निरनिराळ्या व्यक्ती परस्परनिरपेक्ष आहेत. त्यांचे स्वभाव व अभिरुचि हीं आयतींच कायम होऊन आलेलीं आहेत. अनुसंधानांतील घटनेमुळें त्यांच्यात फरक होण्याला अवसरच राहिलेला नाहीं. या गोष्टी लक्ष्यांत घेतां नाटकास एकंदरीनें प्रहसनाचेंच वळण मिळालें आहे. प्रहसनास अवश्य असणारी परिहासगर्भ विनोदाची भूमिकाही यास पुरतेपणीं

लाभलेली नाहीं. यामुळें प्रस्तुत प्रकरणास नाटक आणि प्रहसन यांच्या मधलें स्थान देतां येईल. नाटकाचें हे वैशिष्ट्य लक्ष्यांत ठेवून ते वाचलें तर तें कोणासही मनोरंजकच वाटेल.

निरनिराळ्या विवाहित दंपत्यांचे जे बरे वाईट आयुष्यक्रम प्रत्यक्ष वस्तुसृष्टींत नाटककारांच्या निदर्शनास आले त्यांना थोडी विनोदाची डूब देऊन त्यानीं या नाटकाची रचना केली असल्याचें दिसून येते. वैवाहिक आयुष्यक्रम साधारण सुखावह होणे हे पतिपत्नींनीं परस्पराशीं तडजोडीच्या धोरणाने वागण्यावरच अवलंबून असतें. पण या उभयतांच्या स्वभावात, आवडीनिवडींत व वैवाहिक आयुष्यक्रमाच्या कल्पनेत कमालीचा विरोध दिसून आला म्हणजे संसाराला हिडिस स्वरूप कसे प्राप्त होते याचे चित्र रा. ताम्हणकरानीं माधवराव व यमूताई या पात्राच्या द्वारे चागल्या रीतीने दाखविले आहे. जुन्या वळणाची पत्नी व नव्या विचाराचे पति असा गंगा जमनी संबंध आला म्हणजे संसाराचा खेळखंडोबा कसा होतो हें पुष्कळांच्या पहाण्यांत किंबहुना अनुभवासही आले असेल. सुशिक्षित स्त्री-पुरुषाच्या संख्येत जोपर्यंत विषमता रहाणार तोंपर्यंत अशा प्रकारचे नमुने हे मोठ्या प्रमाणांत घडून येणारच. म्हणूनच पुस्तककर्त्यांनीं माधवराव व यमूताई यांचे रेखाटलेले चित्र वाचकाना साधारण ओळखीचेंच वाटेल. तरी पण माधवरावांच्या मुखांतून बाहेर पडलेले विचार हे आपल्याच मनोगत भावनाचे प्रतिबिंब होत, ही साक्ष पटल्यामुळे त्यांच्यापैकीं कित्येकाना कांहींशी मौजही वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

प्रथम पत्नी जिवंत असता द्वितीय विवाहसंबंध करण्याची नाटक-कारांना आज जी कित्येक सुशिक्षितातही प्रवृत्ति दिसून आली तिचा मुळवा शोधून काढण्याकरितांच त्यांनीं माधवरावांची भूमिका निर्माण केलेली दिसते हे गृहस्थ नुसत्या दुसऱ्या लग्नाच्याच गोष्टी बोलून राहिले नाहींत तर वेश्येच्या घराचा उंबरठा चढण्यापर्यंतही यांच्या विलासप्रियतेची मजल

गोष्टी. जी गोष्ट ज्याला अत्यंत प्रिय वाटते ती मिळण्याची त्याला आशा उरली नाहीं म्हणजे भावनावशतेमुळें त्याची भरारी भलतिकडेही जाण्याचा कसा संभव असतो हेच या प्रसंगानें दाखविण्याचा नाटककारांचा उद्देश दिसतो. यासंबंधात एक गोष्ट लक्ष्यात ठेवणे जरूर आहे. ती ही कीं वैवाहिक अवस्थेत काय किंवा इतर अवस्थेंत काय, मनुष्यास सुस्थिति प्राप्त होणें किंवा त्यावर दुःस्थिति ओढवणें या गोष्टी सर्वत्र एकाच कारणानें उद्भवतात असे केव्हाही म्हणतां येणार नाहीं. मनुष्याच्या शरीराप्रमाणेच त्याच्या मनाचेंही उत्क्रमण आज सहस्रावधि वर्षांपासून होत आलेलें आहे. अर्थात् मानवी शरीराप्रमाणेच, किंबहुना अधिकच मानवी मनाचीही रचना अत्यंत गुंतागुतीची आहे. अर्थात् मनोभावनांचे किंवा मनोवृत्तींचे पृथक्करण करून विशिष्ट स्थितीचें किंवा प्रसंगाचे अमूक एक कारण आहे असे नेमकें बोट ठेवून बिनचूक रीतीनें सांगतां येणे अर्थातच कठिण आहे. परिस्थितीचें ज्या दृष्टीनें जो निरीक्षण करील किंवा प्रत्यक्ष व्यवहारांत ज्याला जसा अनुभव येईल त्याप्रमाणेंच तो आपले विचार निदर्शित करतो. लेखकाच्या मनावर ज्या गोष्टीचा विशेष ठसा उमटलेला असतो त्यासच तो विशेष महत्व देतो. आणि त्याशी समरस होण्यासारखी ज्यांची मनोरचना असेल त्यांनाच त्याची विचारसरणी पसंत पडते.

विवाहाची विसकटलेली घडी पुनः चापचोपून कशी बसवितां येईल याचे प्रस्तुत नाटकांत दिग्दर्शन केलें आहे. त्याप्रमाणेंच ही घडी केव्हांही विसकटणार नाहीं अशी विवाहाच्या वेळींच काय खबरदारी घेणे शक्य आहे याचेही नाटककारांनीं निदर्शन केलें आहे. त्रिंबकराव व लक्ष्मीबाई विष्णूपंत व मथुराबाई हीं जीं दोन दंपत्ये नाटकांत आणलीं आहेत तीं आईबापांनीं उपवर कन्यांच्या विवाहविषयक बाबतींत कशा प्रकारची वृत्ति स्वीकारावी हें दाखविण्याच्या हेतूनेंच आणलीं आहेत. याकरितां तरुण तरुणींना एकत्र आणणारा क्लब, रविवार कुटुंब क्लब, धूम्रपान–प्रतिबंधक

क्लब वगैरे नवोदित संस्थांचेंही सहाय्य घेण्यांत आलें आहे. मुलींच्या वर-संशोधनासंबंधांत आईबापांनीं पुढाकार घेऊं नये, मुलींची निवड कायम झाली म्हणजे त्यांनीं तिला फक्त होकार द्यावा हेच धोरण त्रिंबकरावांनींच स्वीकारलें होतें. आणि त्यांची मुलगी विमल ही सुजाण, समंजस व चाणाक्ष असल्यामुळे त्यांचें हें धोरण यशस्वीही ठरावे यांत कांहीं आश्चर्य नाहीं. स्वतःच्या विवाहासंबंधात विमलने पायाशुद्ध निवड केली इतकेंच नव्हे तर त्यापूर्वी तिने आपली मावशी यमूताई इचा हेकडपणा किंवा हे-गाडेपणा घालवून माधवरावाचा संसार सुखमय होईल अशी योजना केली. माधवरावाच्या व्याख्यानांनीं जे कार्य झाले नाही ते विमलच्या लडिवाळ पण आस्थेवाईक उपदेशाने झाले हा नाटकांतलि एक वाखाणण्यासारखा प्रसंग होय.

विमलेप्रमाणेच विष्णुपंतांची मुलगी शशिकला व शारदा याही सुशिक्षित तरुणीना आपापले विवाह ठरविण्यासंबंधांत पूर्ण स्वातंत्र्य मिळाले होते. यांतील पहिली तरुणी ही सहवासोत्तर प्रेमाची पुरस्कर्ती आहे. तरी पण आपलीं दोघाचीं बिऱ्हाडे अगदी स्वतंत्र आणि पृथक असली पाहिजेत असा ' सहवासास विरोधक ' करार ठरवूनच तिनें बॅरिस्टर रामचंद्राशीं विवाह केला ! दुसरी शारदा हिचा मुख्य भर आर्थिक स्थिति चागली असण्यावर आहे. श्रीमंत पुरुषाची गुलामगिरी आनंदाने स्वीकारण्यास स्त्रिया जशा तयार होतात त्याप्रमाणेच माहेरून इस्टेट आणणाऱ्या स्त्रियां-पुढें गोंडा घोळण्याचे कामीं पुरुषही कमीपणा मानीत नाहींत हें तत्वज्ञान तिनें एका प्रसंगीं निवेदन केले आहे. तरुणी ही शिक्षणसंपन्न असली म्हणजे रूप किंवा पैसा यांना तादृश महत्व रहात नाहीं अशी साधारण कल्पना असते. या कल्पनेस धक्का देणारी सईबाईची परिस्थिति नाटक-कारांनीं चित्रित केली आहे. ही बाई सुशिक्षित होती. पण ती कुरूप असल्यामुळें तिला पत्करण्यास कोणी तयार होईना. अखेर सरदार भाऊराव

यांच्या प्रथम पत्नीच्या निधनानें मोकळें पडलेलें गृहिणीपद तिला लाभून तिचा संसार उभा राहिला.

याशिवाय नाटकात मीनाक्षीचेही एक उपकथानक घालण्यांत आलें आहे. ही स्त्री वेश्येची कन्या होती. पण नाटकातील इतर अविवाहित तरुणींप्रमाणेंच सुशिक्षित आणि पदवीधर होती. पुरुष दोन बायका करतात त्याप्रमाणेंच आपणही दोन नवरे बागवावेत असें तिच्या मनांत येऊन तिने हा प्रयोग करून पाहिला. या प्रयोगात अर्थातच तिला यश आले नाही. हे प्रकरण घातल्या नाटकांतलि वातवरणावर अशुद्धतेची छाया पडेल ही जाणीव नाटककारानाही असली पाहिजे. पण स्त्री–पुरुषांच्या समान हक्कांचे तर्कट प्रसंगवशात् किती दूरवर पसरणें शक्य आहे हें दाखविण्यासाठींच, अशुद्धतेचा धोका पत्करूनही, त्यांनीं मीनाक्षीच्या प्रयोगास नाटकांत इतकें प्राधान्य दिलें असावे असे दिसतें. याप्रमाणे या नाटकांत विवाहित व अविवाहित अशा स्त्री–पुरुषांचे निरनिराळे नमुने दाखविण्यांत आले आहेत. संसाराचा गाडा व्यवस्थित चालावा याकरितां पुरुषांना कष्ट करावे लागतात हे ध्यानात ठेवून स्त्रियांनी त्याच्या तंत्राने वागण्यांतच खरें प्रपंचसुख आहे हे दांपत्य–रहस्य, नाटककारांनीं या तत्वाचा वस्तुपाठ बनलेल्या यमूताईच्या तोंडून वदविले आहे. त्याप्रमाणें सुशिक्षित बायका सहकारिणी असाव्यात अशी महत्वाकांक्षा बाळगणाऱ्या पुरुषावर, अशा बायकांशी रुबाबदार व अभिजात रीतीनें वागण्याची जबाबदारी कशी येऊन पडते हेही नाटकांतलि नवपरिणीत वधूवरांच्या उदाहरणावरून ध्वनित केले आहे. वैवाहिक आयुष्यक्रमासंबंधाने आज तरुणतरुणींच्या मनांत कोणत्या कल्पना वावरत असल्या पाहिजेत याची रूपरेखा दाखविण्याचा नाटकाचा जो दुसरा उद्देश तोही नाटककारांनीं मनोरंजक रीतीनें व अगदीं प्रचारांतली भाषा योजून सिद्धीस नेला आहे.

# नाटकांतील पात्रें.

**यमूताई**—एक जुन्या वळणाची मध्यम वयस्क गृहिणी

**माधवराव**—यमूताईचे पती-नव्या वळणाचे व सुधारणावादी.

**कु. सईताई**—एक अविवाहीत पदवीधर तरुणी.

**शारदा**—नुकतेच लग्न झालेली पदवीधर तरुणी.

**मिनाक्षी**—वेश्येची पदवीधर मुलगी.

**बळवंतराव**—एक वकील-मिनाक्षीचा एक पती.

**हणमंतराव**—एक सुखवस्तु मध्यम वयस्क गृहस्थ

**त्रिंबकराव व लक्ष्मीबाई**—सुखी व उदार मतवादी जोडपें

**विष्णुपंत व मथुराबाई**—एक सुखी जोडपें.

**रा. सा. कात्रे**—एक वयोवृद्ध पेनशनर.

**बॅ. रामचंद्र**—एक विवाहेच्छु बॅरिस्टर.

**शशीकला**—एक विवाहेच्छु नवमतवादी कुमारी.

**सरदार भाऊसाहेब**—एक विधूर गृहस्थ.

**घारुअण्णा**—मिनाक्षीचा दिवाणजी व तिच्या दोन पतींपैकी एक.

**गोविंद व राधा**—गडी व मोलकरीण.

**विमल**—एक पदवीधर विवाहेच्छु तरुणी

**डॉ. वामन**—एक अविवाहीत तरुण डॉक्टर

**आईसाहेब**—डॉ. वामनची आई

याच लेखकाची पुढील नाटकें.

१ धंदेवाईक

२ देशभक्त ( संगीत )

३ आमच्या शाळा

४ डॉक्टरीण ( संगीत )

## —अभिनव वाङ्मय माला—

सदर मालेतर्फे नाटकें, कादंबऱ्या, लघुकथा संग्रह, काव्य संग्रह, चरित्रें, वगैरे विविध प्रकारचे वाङ्मय दर तिमाहीस एक पुस्तक या प्रमाणें प्रसिद्ध करण्यांत येईल.

मालेचा वर्गणीदार होण्यास प्रवेशफी नाहीं. परंतु फॉर्म भरून देऊन, प्रत्येक प्रसिद्ध होणारें पुस्तक घेण्याची जबाबदारी वर्गणीदारावर पडेल.

वर्गणीदारास खास सवलत म्हणून खालील पुस्तकें सध्यां पाऊण किंमतीस मिळतील. पुस्तकें निदान पांच रुपयांची तरी घेतली पाहिजेत.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | हिंदुधर्म आणि सुधारण प्रि. गोळे | ३—०—० |
| ( २ ) | ब्राम्हण आणि त्यांची विद्या ,, | ३—०—० |
| ( ३ | वामन मल्हार जोशी चरित्र—कानिटकर | ०–१२—० |
| ( ४ ] | मधुकराचा गुंजारव ( काव्य संग्रह ) | ०—६—० |
| ( ५ ) | प्रे. विल्सन चरित्र | १—०—० |
| ( ६ ) | सं. हनुमान युद्ध नाटक | ०–१२—० |

## —पुढील प्रसिद्ध होणारे ग्रंथ—

( १ ) मोंगलाई ( कादंबरी )
( २ ) धंदेवाईक ( नाटक )
( ३ ) प्रेमोत्तर विवाह ( कादंबरी )

सर्व पत्रव्यवहार खालील पत्त्यावर करावा.

ना. त्रिं. भिडे, बी. ए.
चालक,
अभिनव वाङ्मय माला
विष्णुपुरा, पुणें नं. २.

संगीत

# दाम्पत्य-रहस्य

## अंक पहिला

### प्रवेश पहिला.

वेळः—रात्रीं नवाचा सुमार.

**स्थळ**—एका मध्यम स्थितीतलि कुटुंबाचें घर सदर गृहांतील गृहिणी सौ. यमूताई आपले पती माधवराव यांची अतुरतेनें वाट पहात दाराशी उभी आहे. पलीकडे नऊ वर्षाचा रघु पलंगडीवर निजलेला आहे. दोहो बाजूला भिंतीला आरसे टांगले आहेत. दिवाणखान्यांत एक टेबल, त्यावर दिवा व त्याजवळ खुर्ची, यमूताईचा वेश म्हणजे साधे पातळ, अंगात कशिदा काढलेली चोळी व साधाच आंबाडा.

यमुताई—( घड्याळांत पाहून ) नऊ वाजले, अजून यांयचं नाहीं. किती हा उशीर! कुठें जातात ठाऊक कोणाला. या पुरुषांचा कांहीं नेम नाहीं. आतां दारांत संध्येची पळी घालतें म्हणजे तरी घरची आठवण होऊन लवकर घरीं येतील. [ कडीत पळी घालते व मानसगीत घेऊन एक गाणें गुणगुणू लागते.]

पद.

( चालः-मधुर किती कुसुमगंध सुटला. )

हरि रे तुझी मुरली।
किती गुलजार ॥ धृ० ॥
पाक करितां पळत मीं सुटलें।
टाकुनि उघडें द्वार ॥ १ ॥
न्हाणित नाहतां धांवत आलें।
पाठिवरीं कुंतल भार ॥ २ ॥
तान्हयास मी ढकलुनि दिधले।
भांबवितो नंदकुमार ॥ ३ ॥
शुकबक मैना वृक्षि स्थिरावली।
मुरलि रव अनिवार ॥ हरी ॥ ४ ॥

[ माधवराव आल्याची चाहूल लागून हातांतील पुस्तक गडबडीने ठेवते व कडी काढते. माधवराव येतात व फुलाचा पुडा व वेणी तिच्या हातांत देतात. ]

माधवराव—कां, गाणें कां बंद केलेत? बाकी स्वनःच्या बायकोचें गाणें चोरूनच ऐकावें लागते. सरळ ऐकण्याचे

४०.

किती लोकांच्या नशिबी असेल कोण जाणें ! झालं कां जेवण ? रघू केव्हांसा निजला ? अन् हें काय ?—ही दाराच्या कडींत संध्येची पळी कशाला ?

यमु०—तो निजला केव्हांच अन् दारांत संध्येची पळी घालण्याचा तोडगा केला तेव्हां कुठं घरीं यायची आपल्याला बुद्धि झाली.

माधव०—बरं, पण जेवण झालं कां ?

यमु०—नाहीं झालें घरीं यायच्या आधी कशी जेऊं. आम्ही कांहीं सुधारक नव्हे.

माधव०—बाकी तें होणारच नाहीं म्हणा इतकी वर्ष झाली. हाच झगडा चालला आहे. जरा सोय पाहिलीत तर घरांत आनंद कसा नांदेल ? ( दुर्मुखला होतो. )

यमु०—म्हणजे आनंद न नांदायला काय झाले ?

माधव०—[ जरा आवाज मऊ करून ] बरं, ती वेणी डोक्यांत घाला नी मग वाढा पाहूं चटपट. अन् हें पहा, दहा वाजतां सर्व काम आटोपलं पाहिजे हं. मग थोडा वेळ आपण ' कॅरम ' किंवा बिझिक खेळू.

यमु०—इश्श ! खेळायचें कसलें ?

माधव०—वा, तुम्ही म्हणे, हल्ली ' कॅरम ' खेळण्यांत पटाईत झाला आहां ! रघू म्हणत होता काल.

यमु०—[ वेणी डोक्यांत न घालतां डब्यांत ठेऊन डबा फडताळांत ठेवते ] हें पहा, मला जेवायला लागेल अर्धा तास तरी. सगळं कामबीम ११ पर्यंत तरी आटोपतं की

नाहीं कोण जाणें ! मी कोण दमून गेलें आहे केव्हां निजेन असें झालें आहे.

माधव०—मग इतर काम होईल सकाळीं. जेवा नि निजा.

यमु०—छे ! छे ! आपण आपले जेवा नि निजा. काम आतांच आटोपलें पाहिजे. आपण सात वाजतां कां येत नाहीं ? जेवावं नी पुन्हा जावं हवं तर × × ऑफिसांत. आधीं येऊन जेऊन गेलांत तर परत येईपर्यंत काम आटोपून निजेन सुद्धां मी डाराडूर.

माधव०—मग आपण दुपारी जरा विश्रांती कां घेत नाहीं ? उशीर व्हावयाचा हे आतां गेलीं दहा वर्षे ठरून नाहीं का गेलें बरें वेणी घालतां ना ?

यमु०—तें कांहीं नाहीं आपणच लवकर आलें पाहिजे. मी आधीं जेवणार नाहीं, दुपारी कसलें निजायचें ? दुपारी निजले नाहीं म्हणजे कशी आठापासून सुंदर झोंप येऊं लागते. पहा तर खरे लवकर घरीं येऊन. खाशी लवकर निजत जाईन.

माधव०—( हंसून ) मी येण्यापूर्वींच आपण झोंपला काय किंवा मी आल्यावर आपण आंथरूणाला पाठ लागताच झोंपी गेलांत काय किंवा अकरा वाजेपर्यंत मला जागत ठेऊन बिछान्याला पाठ लागतांच झोंपी गेलांत काय मला सारंच सारखं ?

यमु०—पण सात वाजतां घरीं आलांत तर काय होईल ?

माधव०—सात आठचीं वेळ तर धंद्याची महत्वाची वेळ, त्या वेळीं [ जरा आवाज वाढवून ] घरीं येणं योग्य नव्हे ही गोष्ट मी आज सतत इतकीं वर्षे सांगत आहें पण माझ्या येण्याजाण्याच्या वेळेशीं आपण आपला कार्यक्रम एकदांही जुळतां करून घेतला नाहींत—आपण धुसफुसत व फुसफुसत सगळा काळ कंठींत आहों. काय संसाराची मजा आहे !

यमु०—म्हणजे सगळा दोष माझाचना !

माधव०—कायहो, रघूबरोबर जर आपण जेऊन घेतलं तर काय बिघडेल ? आधीं जेवण्यामुळं आपणास लागणाऱ्या मानींव पापापेक्षां आधीं न जेऊन जो गृह-व्यवस्थेचा गोंधळ गेलीं दहा वर्षे आपण घालीत आहां, ज्या मानसिक यातनेंत आपण मला सारखं पिचत ठेवलं आहे, त्याचं पाप खास अधिक लागेल.

यमु०—बरें उठायचें ना जेवायला.

माधव०—बरं पण ती वेणी घाला आधीं नी मग मला वाढा.

यमु०—पुनः पुनः वेणी घाला, वेणी घाला हें काय ? सकाळीं घालीन उगाच आतां घालून खराब होईल. सकाळला कोमेजून जाईल ना अगदीं.

माधव०—अहो, पण सकाळीं सात वाजतां तर मी बाहेर पडतो. तेथून परत येणार एकला; तोंवर त्या वेणीचा नेर्माल्य होईल कीं ! बाकी देवीचा निर्माल्यच आम्हां भक्तांच्या वांट्याला यावयचा म्हणा.

यमु०—हें पहा, फराळाला चला, वेणीचं कांहीं आतांच नडलेलं नाहीं. मी अगदीं दमून गेलें आहे.

माधव०—[ एकदम संतापून ] बस्स ! आम्हाला जेवायचंच नाहीं. एक नाहीं, दोन नाहीं, दहा वर्षे झालीं ! –विवाह सौख्याचा हा फार्स चालला आहे !

यमू०—इतकें संतापायला काय झालें. अन्न गार होत चाललें.

माधव०—पुरें आतां कंटाळलों. महात्माजींचीं संन्यासवृत्ति बरी, पण केव्हां करून सवरून भागल्या नंतर ! बाकी कर्वे म्हणतात त्याप्रमाणं पाहायचं म्हणजे ८।१० मुलें असूनहि दांपत्याला खरं संसारसुख मिळालेलं असेलच असं नाहीं.

यमू०—आमच्याच सारख्या इतरांच्या बायका आहेतना त्यांचा नाहीं कां संसार झाला ?

माधव०—( संतापून ) मला एक वृद्ध गृहस्थ माहीत आहेत—गेल्या वीस वर्षांत त्यांचें आणि त्यांच्या बायकोचं एकदांही आम्हीं संभाषण ऐकिलं नाहीं. सर्व व्यवहार मुलांच्या नांवानें पण त्यांना दहा मुलं झालेली आहेत !

यमू०—( संतापलेल्या माधवरावाकडे पाहून ) बरंऽऽ, [illegible] ती वेणी ! [ आदळ आपट करीत वेणी बाहेर काढते व डोक्यात घालूं लागते. ]

माधव०—[ घेऊन वेणी फेंकून देतो. ] आहो संतापान केलेल्या गोष्टीचं कांहींच महत्व नाहीं बंर. तें न

केलेल्या गोष्टीपेक्षांहि वाईट! संतापलेल्या स्त्रीबद्दल मृदु व कोमल विचार व विकार कसे उत्पन्न होणार या गोष्टीची तुला बिचारीला या दहा वर्षांतहि जाणीव होऊं नये ना! दुर्दैव आमचें.

**यमू०**—[डोळे चोळीत] आम्हीं केव्हां जेवतो व केव्हां निजतो. याचे पुरुषांना काय करायचें तुम्ही आपले जेवून ध्याना माझी फुलाची वेणी आतां फेंकून दिली आहे पण पुन्हां वेणी आपल्या हातून माझ्या अंबाड्यावर घालून घेईन तर मी खरी पतिव्रता. [ वर तसबिरीकडे बघते व नमस्कार करते.]

**माधव०**—बस बस, नाहीं आम्हाला जेवायचे. [ असें म्हणून कपडे घालतो. ]

**यमू०**—बरें पण चालला कुठें यावेळीं ?

**माधव०**—ज्या ठिकाणीं आम्हाला सुख होईल व आनंद वाटेल तिकडे जातो. आम्हांस सुख द्यावयाचे तुमचे नशिबी नाहीं ना? [ असें म्हणून दुसऱ्या बाजूने निघून जातो.]

**यमु०**—हे न जेवता कुठें बरें चालले. तिच्याकडे तर जात नसतील. मजवर संतापण्याचा हा फार्स तर नसेल. प्रथमच वेणीं डोक्यांत घालते तर? अस्सें दरखेपेला होते. मागाहून वाईट वाटते पण करायचें काय.

[ उलट बाजूनें जातें. व पडदा पडतो. ]

---

# अंक पहिला

——×✱×——

## प्रवेश दुसरा

[ वेळ—संध्याकाळी ५ वाजतां. जागा—म्युनिसिपल बाग. ]

[ काळी व कुरुप पण बी. ए. सईबाई म्युनिसिपालिटीच्या बागेंत फिरत आहे. समोरून विचारी व कष्टी माधवराव येतात. ]

**सई०**—कां भाऊराव आज रिकामेसे?

**माधव०**—जरा कंटाळा आला म्हणून आलों बाहेर झालें.

**सई०**—कां बसणार का पांच मिनिटें?

**माधव०**—या बसूं या हवं तर! [ दूर दूर बसतात. ]

**सई०**—रघूची तब्बेत् बरी आहे ना?

**माधव०**—हो बरी आहे.

**सई०**—सध्यां विशेष पुण्यांतलि चळवळ कोणती?

**माधव०**—वा! शालिनीबाईंच्या विवाहानं अगदीं मुंबई–पुणें हादरून गेलं आहे ना?

**सई०**—हो! असं झालंय खरं!

**माधव०**—कां हो सईताई, शालिनीबाईंना कोणा हिंदूनें मागणी घातली नाहीं हें खरं कां? हल्लीचें सुशिक्षित वयानें बरोबरीच्या स्त्रीशीं लग्न करायला घाबरतात. त्यांना कमी वयाचीच बायको हवी असते म्हणे, खरं का हो हें?

सई०—(हंसून) मला बाई हें कांहीं समजत नाहीं. पण हा विवाह राष्ट्रैक्याला पोषक असाच नाहीं कां झाला ?

माधव०—आज तरी एवढी आमची तयारी नाहीं. आमच्यांतील सुशिक्षीत व प्रौढ कुमारिकास स्वधर्मी नवरे मिळावयाची पंचाईत पडावी हें आमचें दुर्दैव नव्हे काय !

सई०—प्रश्न थोडा गुंतागुंतीचा आहे खरा.

माधव०—प्रथम जातीजातींतलि पोटभेद मोडा. ब्राह्मण स्त्री एकदम मांसाशनी परधर्मीयाशी विवाह करते हें पटत नाहीं. हो पण खरंच, तुमच्या विवाहाचं काय झालं ?

सई०—( लाजून स्मित करून ) एका पदवीधर गृहस्थांना मी कुरूप आहे असं आधी कळवलं तरी त्यांनी आपल्या गांवी मला पहायला बोलावले. तेथें गेल्यावर आमच्या उतरण्याच्या जागीं पहायला न येतां कुरूप या मबन्नीवर त्यांनीं मला परस्परच नकार दिला.

माधव०—हें पहा ताई, तुम्ही अशा अनोळखी माणसांशीं ह्यापुढें बोलणं करणंच मुळीं ठीक नाहीं. पण कां हो, एखाद्या गृहस्थाची बायको आजारी असली आणि तो गृहस्थ तुमच्याशीं लग्न करावयाला तयार असला तर तुम्हीं लग्न कराल कां ?

सई०—छेः, छेः ! त्या बिचारीच्या सुखांत मी कधींच माती कालविणार नाहीं.

माधव०—तो एक माझा मित्र आहे. त्याला घरीं सुख नाहीं म्हटलेंत तरी चालेल. कुटुंब आजारी. बाळंतपण म्हणजे पुनर्जन्मच. अशा बायकांना पुनः पुन्हा संतती होणें तर वाईट. तिलाही यापुढें मुलें नको आहेत.

सई०—मग तिचें ऑपरेशन करवा. [अगदी हळूं अवाजांत] नाहीतर त्या मित्रास संतति नियमनाचें ऑपरेशन करावयास सांगा.

माधव०—ती बाई आजारी आहे व तिच्याशीं त्याचें गेलीं दहा वर्षे झालीं बिलकूल पटत नाहीं.

सई०—अहो पण तो पटवून कां घेत नाहीं ? तिला शिकवावें सवरावें मनासारखी शहाणी करून वागवून घ्यावी.

माधव०—सईताई तुम्हीच अशी एखादी शाळा काढा ना ?

सई०—हो तशी एखादी संस्था हवी खरी, पण तो पुढचा प्रश्न आहे.

माधव०—हा प्रश्न सईताई फार महत्त्वाचा आहे. आमचे घरचे तुम्हास एकंदर प्रकरण माहीत आहेच.

सई०—यमूआक्का तशी समंजस आहे नाहीं ? [मिस्कीलपणें हंसते]

माधव०—परवां तुम्हीं आम्ही घरीं ब्रिझिक डाव खेळलो ना तेव्हांपासून कोण घरीं गोंधळ उडून गेला आहे. अगदींच वडी बिघडली आहे. त्रासलो बुवा.

सई०—छे असे त्रासून कसें चालेल आक्काशी मी एकदां बोलेन बरे कां? तिची तब्बेत काय म्हणते.

माधव०—तब्बेत कांहीं ठीक नाहीं. सांगितलेलें औषध घ्यायचें नाहीं. परवां बाहेरच्या तीन दिवसांत कपडे फार भिजवायला नकोत म्हणून जमिनीवर नि.ल्यां आणि आतां संबंध आंग ठणकतें आहे म्हणन रडत बसल्या आहेत.

सई०—तुम्ही त्यांना नीट समजवून द्यावें कीं कपड्यांना विटाळ नाहीं म्हणून.

माधव०—आमचा प्रपितामह आला तरी या बायका समजूत पाडून घ्यायच्या नाहींत; आम्ही मेल्यावर मग मात्र रडत बसतील.

सई०—असें अगदीं कातावतां कां, मी येईन एक दिवस तेव्हां बोलेन तिच्याशी.

माधव०—हो पण आमचे ते अज्ञात मित्र कोण असावेत असं तुम्हाला वाटतें? आमचा घरचा एकंदर प्रकार सांगितलाच तुम्हाला.

सई०—(सरोष हंसून) अस्सें होय, अस्सें ! असा उलट घांस घेत होता होय? छे: छे, आक्काला काय वाटेल? बरं जाऊं चला. [एकदम चेहरा बदलतो. लाली चढते. व ती एकदम उठून तडक चालूं लागते.]

---

# अंक पहिला.

## प्रवेश तिसरा.

[ मिनाक्षी व शारदा. मिनाक्षी झकपक पोषाखांत तर शारदा साधे पांढरे पातळ नेसलेली पण टापटीपीचा पोषाख केलेली. स्थळ—उत्तम रीतीनें सजविलेला दिवाणखाना. ]

**मीनाक्षी**—हे पहा शारदा, गेल्या पांच वर्षांत मी आईच्या इच्छेप्रमाणें वागून तिला सुख दिलें आतां मी एक नवा पण चमत्कारिक प्रयोग करून पहाणार आहे.

**शारदा**—कां कसला प्रयोग करणार? लग्न करायचें ठरलें ना? आईची संमति मिळाली कीं नाहीं?

**मिनाक्षी**—हो मिळाली बाई आईची संमति.

**शारदा**—मग कोणाची निवड झाली?

**मीनाक्षी**—तेंच सांगते ऐक. सध्या पहिली बायको जिवंत असतां दुसरी बायको करण्याची सुशिक्षितांत सांथच आलेली दिसत आहे. बाकी यांत आश्चर्य करण्याजोगं काय आहे? विवाहित पुरुषांची प्रगती पन्नास वर्षे पुढें गेली आहे तर विवाहित बायका जेथल्या तेथेंच बसून आहेत.

**शारदा**--मग त्याचा तुझ्या विवाहाशी संबंध काय?

**मीनाक्षी**—ऐक तर खरं त्यामुळं पुरुष नव विचारांच्या

कुमारिकेकडे साहजिकच ओढला जातो. अशा पुरुषांच्या बायकांनीच आतां चार पावलें पुढें झालें पाहिजे.

शारदा०—नाहींतर काय होईल म्हणतेस?

मीनाक्षी—काय होईल तें नव्हे तर काय होत आहे तें ऐक, मधें मधें वर्तमानपत्रांत कोण वदंता कीं अमके अमके प्रोफेसर अमक्या मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थिनीशीं लग्न करणार आहेत. अमका एजंट अमक्या समाज सुधारकाच्या मुलीशीं लग्न करणार आहे.

शारदा०—खरेंच एका मोटार ड्रायव्हरचा संवाद एका पत्रांत आला होता कीं— .... .... .... ....

मीनाक्षी०—या वर्तमानपत्राच्या बातमीदारांना तर काय खुस-खुशीत बातम्या हव्याच असतात.

शारदा०—म्हणे एक श्रीमंत महाराज आपल्या तृतीय पत्नीसह येथें आले तर सुधारक दुर्धारक त्यांना मानपत्रावर मानपत्रें देत होते. तीनतीन बायका करूनही त्यांचा सामाजिक दर्जा कमी झाला नाहीं. पैसा होताना त्यांच्याजवळ पण त्यानें सर्वांनाच ××× दाखविला. त्यांच्या पहिल्या दोघी बायकांच्या दुःखाची मात्र कुणालाच आठवण झाली नाहीं!

मीनाक्षी०—बस्स! मी देखील आतां एक नवा प्रयोग करून

पहाणार आहे. पदवधिर स्त्रियांसुद्धां प्रथम पत्नी जिवंत असलेल्या पुरुषाशीं सुखानें संसार करूं शकतात तर माझ्यासारखी पदवीधर स्त्री दोन नवऱ्यांशीं सुखानें संसार कां बरं करूं शकणार नाहीं? शारदे, तुझा ग बाई, काय लग्नाचा अनुभव आहे? तुझ्या अनुभवावरून मी माझे पुढचे बेत ठरवणार आहे. घरांत बायकांचाच वरचष्मा पाहिजे. या मेल्या पुरुषांची बटीक होऊन रहाण्यापेक्षां यानांच कां आपले दास करूं नये? शारदे खरेंच, तुझें नुकतेंच लग्न झालें आहे. तुझा एकंदर अनुभव सांग. तुझं कसें काय चाललें आहे?

शारदा०—माझें सध्या तरी बरें आहे. आमचा एक आपला साधा करार आहे कीं त्यांनीं मला कोणताही हुकूम करायचा नाहीं. त्यांचा सारा वेळ बाहेर जातो. रात्रीं ९ वाजतां ते घरीं येतात, सकाळीं ९ वाजतां बाहेर जातात. मधला वेळ मी स्वतंत्रपणें घालविते. दुपारीं चांगली झोंप घेते. ते घरीं येतात तो अगदी ताजीतवानी झालेली असते. कायद्यानें पतीला स्त्रीच्या देहाचा ताबा दिलेला आहे, पण तसा ताबा मी तुज-वर कधींच चालविणार नाहीं असें मी मुळीं लिहूनच घेतलें आहे. [ बळवंतराव वकील प्रवेश करतात. ]

बळवंत०—कां मीनाक्षी, मैत्रिणी मैत्रिणींची कसली चर्चा

चालली आहे? गेले आठ दिवस मी तुझी एकांतात गांठ घेण्याचा प्रयत्न करीत आहे पण माझी दादच लागत नाहीं.

मीनाक्षी—कां असं एवढं महत्वाचं काम तरी कोणतं?

बळवंत०—माझं काम अजून तुझ्या लक्षांत येत नाहीं? कीं लक्षांत येऊनही वेड घेऊन पेडगांवाला जातेस?

मीनाक्षी०—हां हां, तें तुमचं जुनं वेड होय? बरोबर आतां त्या वेडाला सवड मिळाली आहे खरी. आईनी लग्नाला परवानगी दिलेली तुम्हांला कोणी सांगितलें? काय, तुम्हांला माझ्याशीं लग्न करायचं आहे?

बळवंत०—होय. त्या करितांच तर मीं येवढ्या खेपा घातल्या.

मीनाक्षी०—मी आहे कबूल, पण एक अट आहे माझी.

बळवंत०—अट!

मिनाक्षी०—होय एक अट आहे.

बळवंत०—पण अट तरी कोणती?

मीनाक्षी०—आधीं अट कबूल असल्याचं वचन द्या आणि कबूल केलेली हुंड्याची दहा हजारांची रक्कम पूर्वीं माझ्या हवालीं जामिनकीबद्दल करा.

बळवंत०—हें पहा, हुंड्याबद्दल दहा हजारांचा चेक लिहूनच आणला आहे, पण तुझी अट तरी काय तें ऐकूं दे. लग्न करायचें आणि पुढें कांऽऽहीं नाहीं, अशी तर नाहींना तुझी अट? मी मुंबईला आणि तूं सोलापुरला राहायाचें असें नाहीं नां? कां

चैनीच्या आड येणारीं मुलंच होऊं द्यायचीं नाहींत. हमखास संतति-नियमन?

मीनाक्षी०—हें पहा मला मुलं हवीं आहेत. अट दुसरीच आहे, वचन द्या अट कबूल म्हणून.

बळवंत०—मग काय गंगेसारखं मूल झालं कीं टाक नदींत असं करून तूं गंगाभागीरथींचा कित्ता गिरवणार आहेस?

मीनाक्षी०—नाहीं नाहीं; मुलांनां खायला घालायला माझ्याजवळ खूप पैसा आहे, फक्त माझी अट कबूल करा.

शारदा०—कां ग मीनाक्षी, हा दहा हजारांचा हुंडा घेण्याची ही काय भानगड आहे?

मीनाक्षी०—आतांपर्यंत नवरे मुलगे हुंडा घेत आले, आतां नवऱ्या मुलीहि पण हुंडा मागणार! परवां ××× पत्रामध्यें....म्हणे एका विदुषीचा लेख आला आहे त्यांत तिनें लग्नाच्या आधीं दहा हजारांची मागणी केली. काय तर म्हणें मी नोकरी सोडली त्याबद्दल नुकसान भरपाई द्या. बरें, तो होता बडा हजारो रुपये मिळविणारा ऑफीसर त्यानें दिले दहा हज़ार. अग, आय. सी. एस्. नाहीं कां मागत पंचवीस हजार? आतां मी तर बी. ए. आहे, मला दहा हजार तरी हुंडा पाहिजेच. आपुडें पुरुषांचा चांगला सव्याज वचपा काढला पाहिजे.

शारदा०—बरोबर आहे; ही गोष्ट आधीं माझ्या लक्षांत नाहीं आली; मी सुद्धां दहा हजार उकळलें असते. अग परवां म्हणे एका सुशिक्षित मुलीनें नोकरी करून सांठविलेला पैसा हुंडा म्हणून नवरदेवाला दिला. शिवाय ती होती बी. ए. तो कोण होता बरें—? नाहीं आठवत जाऊं दे.

मीनाक्षी०—[ शारदेला उत्तर न देतां. ] बरं, बळवन्तराव, काय ठरलं ? वचन देतां कीं नाहीं ?

बळवंत०—मुलं झाली तरी चालतील, मुलं बुडावायची नाहींत, मारायाची नाहीत; बरें आपण राहणार एकत्र आणि एकाच घरांत मग आतां काय राहिलं ? माझं सर्वस्व विकून दहा हजारांची रोकड केली आहे ती तुला देणार, मग तूं मला कोठेहि नेलेंस तरी चालेल आतां न सांगण्याजोगी अट तरी कोणती ?

मीनाक्षी०—तें कांहीं नाहीं, आधीं वचन, आणि मग अटीची परिस्फुटता. द्या तो चेक इकडे आणि म्हणा तीन वेळां 'अट मान्य' 'अट मान्य' 'अट मान्य.'

बळवन्त०—अट मान्य! अट मान्य!! अट मान्य!!!

मीनाक्षी०—[ इतक्यांत धारोपंत येतो त्यास ] हें पहा धारोपंत, हा चेक घ्या, आणि वटवून माझ्या नांवावर बँकेंत रोख रक्कम भरून या, जा.

**घारो०**—हें पहा मीनाक्षी, चेक वटवून आणतो, पण बळवंत-रावांना लग्नाचें वचनबिचन देऊं नको हं. आधींच तूं मला अर्धवट वचन दिलें आहेस मग तें थट्टेंत कां होईना, हरिश्चंद्रानें तर स्वप्नांतलें वचन पाळलें. मग तूं थट्टेतलें वचन तर पाळलेंच पाहिजेस.

**मीनाक्षी०**—( हंसून ) आहे, आहे बरें लक्ष्यांत. एवढं माझें काम करून या, जा. मग तुमच्या प्रश्नाचें उत्तर देते. [ घारोपंत जातो. ] हें पहा बळवंतराव, मी तुमच्याशीं लग्न करणार, मला मुलं होणार, कबूल ना तुम्हांला ?

**बळवन्त०**—( अधीरतेनें ) कबूल, कबूल, सर्व कांहीं कबूल ! आतां उगाच वेळ कां ? [ शारदाबाईकडे वळून ] शारदाबाई तुम्हीं आतां जाना आपल्या घरीं ? [ त्या हसून मिनाक्षीकडे पाहतात ती जा असे डोळ्यानें खुणावते. ] बोल आतां, आणखी काय काय करूं ? चंद्राला खालीं आणूं कीं बळीला स्वर्गांत उडवूं कां इंद्राला खालीं पाताळांत पळवूं ? काय ? करूं तरी काय ?

**मीनाक्षी०**—हें पहा, मी तुमच्याशीं लग्न करणारच पणऽऽ [ अगदीं गंभीरपणें ] मला आणखी एक दुसरा नवरा करावयाचा आहे.

**बळवन्त०**—( दचकून ) काऽय ? दुसरा नवरा ! परवां पांचाली

नाटक झालें, त्यांत सुद्धां दुसऱ्या नवऱ्याची कल्पना नाहीं. मग तूं ही कल्पना कोठून आणलीस ? छेः बुवा मला सवतोबा मुळींच खपणार नाहीं ! खरोखर एका म्यानांत दोन तरवारी सुखानें गुण्यागोविंदाणें रहाव्या तरी कशा ?

**मीनाक्षी०**—अट तर, तुम्हीं पूर्वींच कबूल केली आहे. तुमचे सर्वस्व जे दहा हजार रुपये, ते तर एव्हांना माझ्या नांवावर पडले असतील—आतां सुखासमाधानानं माझे एक पती म्हणून रहाणार कीं नाहीं ! बाकी तुम्ही आतां माझी कोणतीहि अट मानणारच पण ती बळजबरीनें नको. सुखानें तुम्ही मानली पाहिजे एवढेंच. मी जरा आंत जाऊन येतें हं. [ जाते ]

**बळवंत०**—[ स्तब्ध राहून विचार करतो ] भयंकर मोठ कोडं आहे ! नाहीं म्हणायचीं सोय नाहीं. उद्या भीक मागावी लागेल. जाऊं द्या कीं ! बाहेरच्यांना नसतात कां अनेक [ मिनाक्षी येते ] बरं बरं, कबूल ! पण आमचे सवतोबा कोण होणार तें तर सांगाल ?

**मीनाक्षी०**—तें न सांगतांच तुमच्या लक्षांत यायला पाहिजे होतं. ज्या अर्धवटांना मी लग्नाचं अर्धवट वचन दिलं आहे तेच ते अर्धवट घारुअण्णा. त्यांना दिलेलें अर्धें वचन मी पाळणार आहे.

**बळवंत०**—पण आतां नारदाचं काम कोण करणार? द्रौपदीची वांटणी पांचांत व्हायची होती. या द्रौपदीची वांटणी आम्हां दोघांतच होणार आहे. पण तूं द्रौपदी सारखें दर महिन्याला अग्निदिव्य करणार कां?

**मीनाक्षी०**—बरं, बरें! आतां चलायचें नां?

**बळवन्त०**—[ घोंटाळतो ] बरें लग्न ठरल्याचा तुमच्या बाजूचा बयाणा.

**मीनाक्षी०**—इश्श! [ दोघे एकमेकांच्या जवळ जातात. ] नको बाई—आज माझा शेवटचा जलसा आहे. तुम्ही येणार ना? चला जाऊं.

[ जातात. ]

---

# अंक पहिला.

——×※×——

## प्रवेश चवथा.

[माधवराव व हणमंतराव गप्पा मारीत बसले आहेत. वेळ रात्रौ १० चासुमार ]

**हणमंत०**—अरे म्हणतोस तरी काय. दहा वाजून गेले आणि आतां कुठें फिरायला चल म्हणतोस! तुझें लग्न झाल्याला आज दहा वर्षे झालीं. मला वाटतें या

दहावर्षांत इतक्या रात्रीं बाहेर पडण्याचा हा पहिलाच दिवस असावा ! कां घरीं कांहीं "खडा-ष्टक" माजलें आहे वाटतें ?

माधव०—हे पहा. ते घरचें राजकारण बोलूं आपण मग केव्हांतरी सवडीनें, सध्या अगोदर बाहेर चल ! माझ्या मनाला कांहीं तरी करमणूक पाहिजे आहे !

हणमंत०—मग कुठें चलायचं ? प्रभातचा "माया मच्छिंद्र" का गंधर्वाची "कान्होपात्रा."

माधव०—मला आज तसली नाटकी व फसवी मृगजलवत् करमणूक नको आहे ! कुठलीतरी जिवंत करमणूक पाहिजे आहे !

हणमंत०—कोण तूं माधवरावच कां हें बोलत आहेस ?

माधव०—होय माधवरावच मी ! कोणत्याही गोष्टीला कांहीं तरी मर्यादा असते. आज दहा वर्षे झालीं माझ्या लग्नाला—क्षुल्लक गोष्टींत जर मनाच समाधान घरीं होत नाहीं, तर मग काय करणार ? मी आपल्या-कडून पराकाष्ठा करून पाहिली ! दहा वर्षे म्हणजे कांहीं थोडी नव्हत—एवढ्या अवधींत—एकादं रानटी जनावर सुद्धां माणसाळल असतं—

हणमंत०—म्हणून दहावर्षे यमूताईनां तुझ्या मनाप्रमाणें माण-साळण्याचा प्रयत्न करून त्यांत फसगत झाल्या-मुळें आज तूं स्वतःच रानटी व्हायच ठरवलं आहेस वाटतं ?

**माधव०**—तूं सुद्धां मला दोषच देणार ? आज आठदहा दिवस झाले मी जेवायला सुद्धां घरीं जात नाहीं—तरी त्याचाही तिच्या मनावर कांहींच परिणाम झालेला नाहीं—

**हणमंत०**—पण हे बघ, तुझा स्वभाव कसा हट्टी आहे हें मला माहीत आहे. आज तुझ्या मनांत घराबाहेरची जिवंत करमणूक करून घ्यायचें आलें आहे तेव्हां तूं माघार घेणं शक्यच नाहीं पण मला कां गुंतावतोस असा! उद्या यमूताईंना जर कळलं तर त्या मला काय म्हणतील ?

**माधव०**—तिला काय वाटेल याचा विचार करण्याचें मला आतां कांहींच कारण उरलेलें नाहीं ! तिचा आणि माझा संबध आतां फक्त नांव सांगण्यापुरता !

**हणमंत०**—म्हणजे इथून पुढें यमूताईच्या जिवाचे हाल—

**माधव०**—तीच स्वतःचे हाल करून घेते आहे त्याला मी काय करणार ! हणमंतराव, माझें मलाच आश्चर्य वाटतं— कीं आज दहा वर्षे तरी माझं मन घरच्या घरींच कसं राहिलं ? पण त्यांतही आश्चर्य कांहींच नाहीं— तिच्या वागणुकींतला-सालसपणा-वगैरे कांहीं कांहीं गुण असे आहेत—कीं—ते मूक—अमानूष गुण म्हणतो मी—एकाद्या उडाणटप्पूला सुद्धां कह्यांत ठेवतील पण—आज मी मात्र वैवाहिक मर्यादेच्या बाहेर पाय

टाकण्याचें ठरविलें आहे ! पण हे केवळ मनाच्या समाधानाकरितां. तिच्या विषयींचा माझा आदर यत्किंचितही कमी झालेला नाहीं ! संसारांत जर चुकून एक विलासी आणि एक संन्याशी, अशा दोन वृत्तींच्या माणसांशीं गांठ पडली तर मग असंच कांहीं तरी होणार ! आतां मात्र माझ्या मनाची पुरती खात्री झाली की मला हवं तसं संसारसुख कांहीं घरीं मिळणार नाहीं. माझ्या सुखाला आतां बाहेरची वाट लागली ! बरं आतां हा वादविवाद पुरे झाला चळणार आहेस कां कोठे ?

हणमंत०—चलायचच म्हणतोस तर मग ! चल, तुलाही आज मी एक गंमत दाखविणार आहे !

माधव०—कुठें घेऊन चलणार मला ?

हणमंत०—आपण मिनाक्षीच्या जलशाला जाऊं.

माधव०—ही मीनाक्षी कोण ?

हणमंत०—एका वेश्येची मुलगी, पण तिची वागणूक आहे पौराणिक महानंदे सारखी ! ती बी. ए. परीक्षा पास झालेली आहे.

माधव०—मग ती काय सार्वजनिक जलसे करते ?

हणमंत०—हो पण फक्त जलसेच हं ! तिचा गळा चांगला आहे, पण तिला वैवाहिक सुखाची अपेक्षा आहे ! तिच्याशीं विवाह करायला कितीतरी लोक उत्सु

झाले आहेत—कोणा कोणाची म्हणून नांवें सांगू तुला? एकेक नांव सांगितले तर आश्चर्य वाटेल तुला!

**माधव०**—मला वाटतं त्या यादींत पहिलं नांव तुझंच असेल!

**हणमंत०**—हो—अर्थात आहे! पण मी ते तुला शेवटीं सांगणार होतो!

**माधव०**—आणि तिच्याकडे तूं मला घेऊन जाणार!

**हणमंत०**—अगदीं बेधडक! ती काय जालीम वल्ली आहे पहा तर खरं एकदां—

**माधव०**—चला तर मग! आजच्या दिवस पाहूं या गंमत.

[ पडदा. ]

[ शृंगारलेला दिवाणखाना. गायनवादन चाललेलें आहे. प्रत्येक येणारा मनुष्य दारांतच तबकात रुपाया टाकून आंत येतो. त्यांस एक सुंदर गुच्छ, अत्तर गुलाब, व विडा खास नायिकेकडून मिळतो. एकीकडे नाच चालूंच असतो. जमलेले लोक साधारणत: मध्यम स्थितींतलेच आहेत.

[ माधवराव व हणमंतराव भीत भीत दाराशीं येतात व चोरट्या नजरेनें आंत पहातात. हे गृहस्थ नवखे आहेत हें समजून द्वारपालिका त्यांना एक एक रुपाया टाकून आंत जा, असें खुणावते, ते रुपरुपाया टाकून आंत जातात. माधवरावाला तेथील व्यवस्था पाहून आनंद होतो. अकराचे ठोके पडतांच बाहेरचा मुख्य दरवाजा बंद होतो व कार्यक्रमाला सुरुवात होते. ]

**मिनाक्षी**—आजचा हा माझ्या या सार्वजनिक आयुष्याचा शेवटचा दिवस आहे. आमच्या आईच्या इच्छेप्रमाणें बी. ए. झाल्यावरहि गाण्याच्या बैठकी करून मी

शरिरानें पवित्र राहिलें आहे. या ठिकाणीं आपण जो आनंद अनुभवीत आहां अशा प्रकारचा आनंद आपल्या गृहिणीनींच आपणांस यापुढें आपापल्या घरीं द्यावा असें मी इच्छितें. यापुढं योग्य त्या गृहस्थांची पती म्हणून निवड करून त्यांच्याच संगतींत विवाहित पत्नी या नात्यानें मी काळ घालविणार आहे. ती निवडही होऊन चुकली आहे. आईला मी गेल्या पांच वर्षांत पन्नास हजार रुपये मिळवून दिले आहेतच, त्या रकमेंत त्यांचें व माझें आयुष्य सावकारी करून राहिलो तर सुखानें जाईल.

[ गाण्यास सुरवात होते. ]

१ लावणी.

दिलका दिलभर जलदी मिलावरी ।
　नहितो लाघ अफीम खिलावरी ॥
प्यारे हाय तेरा ध्यान लगारे ।
　रो रो हो रह नैन अंगारे ॥ प्यारे ॥
क्यौ रे लंबा बहुत झुकारे । एक बख्त बहण बु दिखारे

सर्वजणः—हिंदी नको मराठी होऊं दे.

२ लावणी.

दाद कोई नही देता । मय तो जोगिन होउंगी ।
　राख लावा माझे आंगीं ॥ धृ० ॥
हाल हाल फकिरी लेऊं । धुंडत बन बन मे जाऊं
　सख्याला दर्शनें पाहूं ॥

३ लावणी.

नरदेहामध्यें येऊन गड्या त्वां हित केलें नाहीं ।
दारधनाचा लोभ सोडशी तर साधेल तुज कांहीं ॥

**सर्वजण**०—जरा निराळं होऊं द्या कीं—कथेंत आहेच कीं हा वेदांत.

४ लावणी व नाच.

बहुता दिवसा मज दुबळीवर पायधूळ झाडली ।
वाकडी वाट कोणीकडे केली ॥

५ लावणी.

चुकी नसता रुसलेत कसे खरेंच सांगा मला ।
विनविते जाईजुईच्या फुला ॥
शरीर सुखाचे सुभावगं सुरेख सुंदरपण ।
नको मुख पहावया दर्पण ॥
त्यांत गर्भ श्रीमन्त असें हरीनें दिल्हें थोरपण ।
हाताचे सैल न व्हा कृपण ॥ चुकी नसता ॥

[ वाहवा ! वाहवा ! ! ]

**कित्येक जणः**—आतां तांब्याचे जुलमी डोळे होऊं द्यात.

६ जुलमी डोळे

डोळे हे जुलमि गडे, रोखुनि मज पाहुं नका !
जादुगिरी त्यांत पुरी ! येथ उभे राहुं नका !
कशिदा मी काढुं कशी ! त्यांत होती फार चुका !

बोचे सुइ फिरफिरुनी वेळ सख्या,जाय फुका !
खळबळ किति होय मनीं !
हंसतिल मज सर्वजणी !
येतिल त्या संधि बघुनि !
आग उगा लावुं नका !
डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका.

[ नाचत नाचत जाते व पडदा पडतो. ]



# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ एका मोठ्या गोल टेबलाभोंवतीं दोन स्त्रियां व दोन पुरुष ऑपन-ब्रिजिकचा डाव खेळत आहेत. स्त्रियांचा पोशाख झकपक असून पुरुषांनीं अंगांत इमिटेशन सिल्कचे शर्ट घातले आहेत. स्त्रियांच्या अंबाड्यावरून मोगरीच्या वेण्या आहेत. हा या मंडळीचा रविवारचा कुटुंब क्लब होय.]

**त्रिंबक०**—हणमंतराव, अरे, कांहीं हातबीत घ्याल कीं नाहीं? डाव फार कोंडून पडला आहे!

**सई०**—[ अविवाहित ] कांहो नाना, भिडूंना 'हिन्ट्स' द्यावयाच्या नाहींत असं ठरलं आहे ना ?

**लक्ष्मी०**—अग, त्यांना बोलूं द्या; बोलूनसवरून सुद्धां मागच्यासारखीच त्यांना 'डबल गेम' मिळणार आहे.

**विष्णु०**—छे: बुवा, हातांत 'पॉवर' च नाहीं तर हात कसा घेणार ?

**मथुरा०**—पुरेबुवा हा खेळ.—विमल कुठं गेली? तिनं पेटीतरी वाजविली असती !

**विष्णु०**—खरंच, वहिनी. तुमचं तें नव रचलेलं, पद म्हणा ना.

**लक्ष्मी०**—खरं सांगू मला म्हणायला लाज वाटते. पण धीर होईल तेव्हां म्हणेन केव्हांतरी आज नको.

**विष्णु०**—बरें विषय तरी काय त्या पदाचा ?

**सई०**—मी सांगते विषय, या अर्थाचा आहे—

स्त्री पुरुषीं ऐक्य नांदो
नमोते मी श्रीशंभो ॥
श्रेष्ठ कनिष्ठ वादा वाव नसो ।
स्त्री पुरुषी संशयकल्लोळ न उठो ॥
शंका कुशंका लय पावो ।
स्त्री पुरुषीं ऐक्य नांदो ॥ १ ॥
स्त्री पुरुषा सहकारी होवो ।
संतति नियमित सुदृढ होवो ॥
नमोते मी श्रीशंभो ॥ २ ॥
पुरुष सुखवो स्त्रीला ।
स्त्री तोषवो पुरुषाला ।
नमोते मी श्रीशंभो ॥ ३ ॥
विवाहीत नरा वेश्या ।
बरवी कधीही न गमो ।
पतिव्रता स्वपतीला ।
रंभेपरी सदा गमो ॥
स्त्रीपुरुषो ऐक्य नांदो ।
नमीते मी श्रीशंभो ॥ ४ ॥

[ इतक्यांत गोविंदा गडी बाहेरून " यमुनामावशी आल्याति " असें सांगत प्रवेश करतो. " बालबोध वळणाची बाई—प्रवेश करते व लगेच मागे जाते व हांका मारते—ताई. ]

**लक्ष्मी०**—बरं, मी तिला आंत घेऊन येतें बरें कां ?

**त्रिंबक०**—पण, हें पहा, लवकरच या हं [ लक्ष्मीबाई जाते. ]

सई०—काय गुणीबाई आहे ! पण एक नंबरची शंकेखोर ! ! ती कसली आंत येते ? ती म्हणेल, 'हा काय मेला भ्रष्टाकार ! ते माधवराव बिचारे. तिच्यापुढं गोगलगाईपेक्षां मऊ असतात. दुर्दैव बिचाऱ्याचं. खरंच कां हो, हिच्या मतांत परिवर्तन नाहीं कां करतां यायचं ?

( लक्ष्मीबाई प्रवेश करतात. )

लक्ष्मी०—यमूताई काहीं थांबली नाहीं. मी पण तिला थांब म्हटलें नाहीं. ती थांबती तर मग मला उठून जावं लागतें अन् तुमचा सगळ्या मंडळींचा विरस व्हायचा. कांहीं रागबीग आला असला तर मीच एकादे वेळीं तिच्याकडं जाऊन काढीन तिची समजूत !

विष्णु०—पण कांहो, माधवराव तिला कां सुधारूं शकला नाहीं.

त्रिंबक०—त्याचा स्वभाव खरं सांगू आहे थोडा स्त्रैण.

विष्णु०—स्त्रैण म्हणजे काय ?

त्रिंबक०—याचा अर्थ ज्याचे बायकोशिवाय चालत नाहीं असा पुरुष. अहो रागावतो आणि पांच मिनिटांनीं बोलायला जातो. मनुष्यांत कठोरपणा व थोडे संयमन पाहिजे.

[ विष्णुपंत सिगारेट पेटवतो. विमल प्रवेश करते. ]

विमल०—काय ग आई तुमची काय चर्चा चालली आहे. इश्श बाई [ विष्णुपंताकडे पाहून. ] या धूम्रपानामुळें बायका पुरुषांचा कंटाळा नाहीं कां ग करीत आई ?

**लक्ष्मी०**—हे बघ यांना आहे कां कसलें व्यसन. मग मला त्या गोष्टीचा इतका अनुभव नाहीं. पण इतके सोंवळे होऊन चालणार नाहीं [ विष्णुपंत सिगारेट विझवतो. ]

**विमल०**—काका काय होते हो सिगारेट ओढली म्हणजे.

**विष्णु०**—हे बघ विमल सिगारेट ओढलीच पाहिजे अशा मताचा मी नाहीं. पण मनुष्य जर स्वच्छ राहील, त्याच्या तोंडाला जर घाण येणार नाहीं तर दुसऱ्याला कांहींच तक्रार करण्याचें कारण नाही. जसा चहा तशीच सिगारेट. आतां स्त्रियांच्या मिश्र समाजांत सिगारेट ओढूं नये हें खरे.

**लक्ष्मी०**—विमल पुरे झाले आतां तुझें व्याख्यान नवऱ्या-करितां जवळ राखून ठेव.

**विमल०**—आई दुर्दैवानें अशी वेळ आली तर धूम्रपानाचे व्यस-नांतून सुटका करीनच करीन. पहा तर खरी.

**त्रिंबक०**—विमल तसा प्रसंग आला तर मी सुद्धां तुला मदत करीन डरूं नको. फक्त धूम्रपान म्हणजे मद्यपान नव्हे हे लक्षांत ठेव. पानतंबाखू खाणारे लोक तर या विड्या ओढणारापेक्षां वाईट. त्यांच्या तोंडाकडे व दांताकडे पाहवत नाहीं.

**सई०**—अहो या लोकांना स्वच्छता म्हणजे कशाशी खातात हें समजत नाहीं कांहीं पुरुषांच्या दांतावर इतकें कीट दुरूनच दिसते कीं डोळेच मिटावें.

त्रिंबक०—बरें मंडळी सहा वाजले चला आतां. [ जातात. ]

# अंक दुसरा

## प्रवेश दुसरा

[ वेळ दुपारी दोनचा सुमार माधवराव आपल्या बैठकींत बसले आहेत, ते अहो, म्हणून हांक मारतात, यमूताई येतात ]

माधव०—कां तिकडे आंत काय करतां? इकडे येऊन बसा कीं ( ती बाहेर येऊन बाजूला कोंपऱ्यांत बसते. )कांहो तें नवें औषध घेतलेत कां ?

यमु०—घेतलें तर काय झालें. पण आज सर्व आंगच ठणकतें आहे.

माधव०—काल मुळीं आपण रात्रभर घोंगडीवर निजला होतात तर आंग कां धरणार नाहीं; आधींच प्रकृती अशक्त त्यांत तुमचा हा मासिक काल. हा खरा विश्रांतीचा काल. तर त्याच काळाचा तुम्ही तुमची प्रकृती बिघडवून घेण्याकडे उपयोग करतां. वैद्यकीय दृष्ट्या तुमचा देह अशुद्ध अतएव अस्पृश्य हें ठीक पण शरीर स्वास्थ्याकरितां अंथरा पांघरायला कपडे घ्यावयाचें त्यांना हो कसा विटाळ चिकटतो.

यमू०—पण आम्ही आजारी पडलो तर पडूं. आपले काय बिनसते ?

माधव०—अहो आपण आजारी पडला म्हणजे आमचें सर्व कांहीं बिनसतें. तुम्हीं सशक्त व सुखी तर आम्ही सुखी.

यमू०—पण हा काय तुम्हां पुरुषांचा छळ; आमच्या असल्या व्यवहारांत तुम्ही कां ढवळाढवळ करतां ?

माधव०—हे पहा हा प्रश्न तुमचा एकट्याचा राहात नाहीं. गेले सबंध वर्ष अधिकच तुम्हीं आजारांत घालविले. १५।२० दिवसांत जों बरें वाटावें तो पुन्हां तुम्ही दुखणें अधिक करून घेतां. याचा आमचेवर कांहींच परिणाम होऊं नये ना ? तुम्ही स्त्रिया म्हणजे काय अचाट शक्ति व स्फूर्ति आहां, पण केव्हां ? बघा बुवा ! द्या सोडून हा हट्टीपणा व आडमुठेपणा. नीट वागा व लवकर बऱ्या व्हा.

यमु०—बरें हल्लीं म्हणे तुम्हीं त्रिंबकरावांच्याकडे खेळायला जात असतां.

माधव०—होय जातो तर ! मथुरावहिनी, लक्ष्मीवहिनी तुम्हांला रोज हळूंहळूं चालत आणा म्हणून पाठीस लागतात पण तुम्ही कांहीं यायला कबूल नाहीं. अहो बाहेर मित्रमंडळींत बसलं म्हणजे मनुष्याला बर वाटतं

आजाराची विस्मृति होते; पण तुम्हांला कांहीं आमचं ह्मणणं पटत नाहीं. तुम्हीं बाहेर मोकळेपणें हिंडूं फिरूं लागलांत तर कदाचित् प्रकृतीला आराम पडेल.

यमु०—सईताई मी तिथं यावं असं म्हणतात कां? मी आलें तर त्या उघडया पडतील ना? सईताईशीं लग्न करूं कां असं मला थट्टेनं विचारतां; मग त्यांनाच विचारलांत का हा प्रश्न? त्या काय म्हणतात?

माधव०—कुठं ऐरावत, कुठं शामभटाचं तट्टु? त्या आहेत बी. ए. त्यांच्या माझ्यांत कांहीं तरी सारखेपणा? त्यांना एम्. ए. नवरा पाहिजे आहे आणि तें अगदीं साहाजिक आहे.

यमु०—मग परवांच्या त्या एम्. ए. चें काय झालें. आणि तुमच्याशीं तरी लग्न करायला तिला काय झालंय? या मेल्या एवढ्या मोठ्या वयापर्यंत कुमारी राहतात आणि दुसऱ्याच्या संसाराचें मात्र मातेरें करतात. मी आजारी झालें म्हणून काय झालें? आतां काय राहिलं तुमच्या संसाराचं? तीस बत्तीस वय म्हणजे कांहीं अगदीं तरुण पण नाहीं. असलें मी आजारी तर असलें. मला नाहीं हें तुमचें स्वैर वर्तन खपत.

माधव० —हें पहा तुमचं म्हणणं बरोबर आहे. मी म्हातारा झालों हें तुमचं सर्टिफिकेटहि मला मान्य आहे

शिवाय सईबाईचा प्रश्नहि निकालांत निघाल्याचें मी तुम्हांला सांगितलेंच आहे. मग उगाच जिवाला त्रास कां करून घेतां ?

यमु०—ती नाहीं म्हणाली हें सर्व झूट आहे. लग्नाचं कार्य जर लग्नाशिवायच होत असेल तर लग्न तरी कशाला करून घेतील त्या ?

माधव०—हा संशयी स्वभाव द्या सोडून. त्याचा तुम्हांलाच त्रास होतो ना ! आमच्या मिश्रक्लबांत येत जा ! तुम्हीं क्लबांत येऊं लागलांत म्हणजे सईताईचा क्लब आपोआपच बंद होईल. किंवा त्यांना लग्न करून तेथें आपला जोडीदार आणावा लागेल. आमच्या संमिश्र कुटुंब क्लबांत समसमान स्त्रीपुरुष लागतात हा नियम नाहीं कां तुम्हांला माहीत ?

यमु०—आहे माहीत. मला तिथें नेऊन माझी अडाणी म्हणून फजिती करावयाची असेल. सगळ्याच मेल्या चावट, नाहीं तर काय ?

माधव०—शिव, शिव, आपल्या नवऱ्यांकरितां त्या नीटनेटका पोषाख करितात वस्त्रप्रावर्ण झकपक नेसतात म्हणून त्या चावट अं ?

यमु०—नाहीं तर काय ?

माधव०—घरीं मोलकरणीप्रमाणें राहणाऱ्या व घराबाहेर टिळे टिकल्या करून बाहेर पडणाऱ्या त्या सती सावित्री !!

आणि घरीं पतीकरितां नीट नेटक्या राहणाऱ्या त्या स्वैराचारी खासा न्याय ! बरें तुमचे तें पांढरें पातळ नेसून दाखवा कीं; आम्हांला पाहूं द्या कसें काय दिसतें तें.

यमु०—कांहीं नको. उगीच मळवायचे कशाला. बाहेर जायचे वेळीं तें फक्त नेसायचें.

माधव०—म्हणजे नेसलेलें पाहण्याचे इतरांचे नशिबी, आमचे नशीबी नाहीं म्हणता ?

यमु०—असें नव्हे. घरच्या माणसांना काय दाखवायचें ? घरीं काय कसेंहि मळकें सळकें चिरगूट खपून जातें.

माधव०—बरें मग नेसणार कां ?

यमु०—माणसानें हट्टच धरला तर मग काय करणार बरें.

[ आंत जाऊं लागते.

माधव०—अहो बाहेरच नेसायला या बरें कां ? × × × × × म्हणतात कीं स्त्रिया वस्त्र नेसतांना जितक्या सुंदर दिसतात तितक्या नेसल्यानंतर नाहीं दिसत.

[ इतक्यांत चिठ्ठी घेऊन एक मुलगा येतो ]

पोऱ्या—सईताईनीं ही चिठ्ठी दिली आहे. त्यांनी आताचे आतां तुम्हांला बोलावलें आहे.

यमू०—वा ! ठीक!! हें पहा त्यांच्याकडूनचना हें बोलावणं आलं आहे. जा पाहूं. त्यांनाच सांगा पांढरे पातळ नेसून दाखवायला.

[ माधवराव चिठ्ठी वाचतो व ती यमूबाईच्या हातीं देतो त्या ती वाचतात. ]

**माधव०**—मजबरोबर त्यांच्या घरापर्यंत येतां कां हळुंहळुं ? आपण दोघेंहि जाऊं. म्हणजे तिला काय म्हणायचें आहे तेंहि तुम्हाला कळून येईल व संशयाला जागाही राहणार नाहीं.

**यमू०**—छे ! छे ! मी कशाला येऊ ? हा नाहीं कां तुमच्या उभयतांच्या मैत्रीचा सरळ पुरावा ? माझं अडलं आहे तिच्याकडे यायचं ! तुम्हीं जा. निर्लज्य मेल्या ! कुमारी राहतात.

**माधव०**—बरं मी जाऊन येतों. काय होईल तें तुला सांगेनच. ( जातो. ) ( पडदा. )

( सईताई खुर्चीवर बसल्या आहेत. माधवराव प्रवेश करतात. सईताई बसूनच त्यांना बसा म्हणून खूण करतात. )

**माधव०**—कां हो, सईताई अगदीं तांतडीनं निरोप पाठवला ?

**सई०**—अहो, परवां तुम्हीं माझेजवळ काय जें बोललांत ना ? तें मी माझे मैत्रिणीजवळ बोलले. त्यांच्या सांगण्यावरून तुम्हांला पुनः हडसून खडसून ' नाहीं ' हें सांगण्याकरितां बोलावलें.

**माधव०**—पुन्हा सांगण्याची कांहीं जरूरी नव्हती. कशाला तुमच्या मैत्रिणीजवळ चर्चा केलीत ? या बाबतींत मजकडून कधीं कसलाच शब्द बाहेर पडला नसता. आमच्या ब्राह्मण कुमारींनीं ब्राम्हणेतराशीं

किंवा हिंदूेतरांशीं विवाह करण्यापेक्षां योग्य अविवाहित पुरुष न मिळाल्यास विवाहित पण अडचणींत असलेल्या पुरुषांशीं लग्न केलें तरी चालेल, इतकाच काय तो माझ्या म्हणण्याचा आशय. तुमच्यांतील वैगुण्यामुळें तर तुमची स्थिती आणखी अडचणीची तेव्हां एक बाजू म्हणून हा प्रश्न मी त्यावेळीं पुढें मांडला; तुम्हीं त्या प्रश्नाला नकारात्मक उत्तर दिलेंत, प्रश्न मिटला. तुम्हीं होऊन ही गोष्ट चारांच्या कानांवर घातली तर तो तुमच्या आवडीचा व सोयीचा प्रश्न आहे. आमच्या कुटुंबाला मात्र ही गोष्ट मी कळवली आहे. पण त्यामुळें ती तुमचेवर व मजवर अगदीं भडकून गेली आहे.

सई०—मी दिलेला नकार तिला कळला नां ?

हणमंत०—हो, हो, ही तुमची आतांची चिट्ठी देखील त्यांनीं वाचली. ती चिट्ठी तिनें ठेऊन घेतली आहे. या चिठीनें तर आणखी आगींत तेल ओतलें आहे.

सई०—अहो प्रथम नुसता मी निरोप पाठविला त्यानें तुम्हीं आलां नाहींत म्हणून चिठ्ठी पाठवली.

माधव०—चिठ्ठी पाठवली तें बरें झालें. नुसत्या निरोपानें येतों तर 'कां आलां, मी नव्हतें बोलावलें' असं म्हटलं असतं तर मी काय करावें ? तुम्हा बायकांशी सावध असावं तेवढं चांगलं

सई०—बरें, मग आतां हें प्रकरण संपलें ना ? हीं प्रश्नोत्तरें झालीं नाहींत असेंच वागायचें ना ! तुम्ही वागाल तशीं मी वागेन.

माधव०—अर्थात्, माझी बाजू तुम्हांला समजली ना ? उघडा उघड बोलणें झाल्यावर त्यांत आतां काय राहिलें ?

सई०—पण तुमचा प्रश्न जरा धाष्टर्याचा नव्हता कां ?

माधव०—खरें सांगू, या प्रश्नाची चर्चा करूं नये हें बरें. कुमारी स्त्रीला एखाद्या पुरुषानें लग्न करतां का असें विचारणें हें कांहीं मुलखावेगळे आहे, असें मला वाटत नाहीं. त्यांतून आमच्यासारख्या अडचणींतल्या पुरुषांना तर कांहींच हरकत नाहीं. पण तुमच्या समाधानाकरितां म्हणतो हवें तर कीं, तो खरोखरीच मूर्खपणा झाला ?

सई०—अहो, पण तुमचा माझा शैक्षणिक दर्जा काय ?

माधव०—बरोबर. आहे खरा फरक. या दर्जाच्या मुद्यावर तर एकदम चीत ! ( हंसून ) कदाचित् माझें हाताखालच्या बी. ए. शीं लग्न कराल, कदाचित् आज मरतो कीं उद्या मरतो असा एम्. ए. तुम्हांला सहकारी चालेल. पण माझा दर्जा हलका खराच.

# अंक दुसरा

—+०+—

## प्रवेश तिसरा

[ विमल व विमलचे वडील त्रिंबकराव. लक्ष्मीबाईही जवळ बसल्या आहेत. ]

**त्रिंबक०**—हं काय विमा, तुझी आतां बी. ए. ची परिक्षा तर झालीस्, तूं पास होणारच. आतां एल्एल्. बी. होणार कीं एम्. ए. होणार ?

**विमला**—अहं. बाबा, पुरुष बी. ए. झाला कीं चालला एल्एल्. बी. कडे तसेंच आम्हीं मुलींनी करावें काय ? मला तर आतां संसारीच व्हावयाचं आहे. हें वर्ष मी उमेदवारीत घालविणार एवढेच.

**त्रिंबक०**—या वर्षांत तूं जगाचें निरिक्षण करण्यांत काल घालविणार असेंच ना ?

**लक्ष्मी०**—मग त्या विष्णुपंताकडचें स्थळ पहा कीं विमलला.

**त्रिंब०**—हें पहा विमलनें वर पसंत करावयाचा व आपण तिला फक्त हं म्हणायचें. स्वतः त्यांत कांहीं पुढाकार घ्यावयाचा नाहीं असें मी ठरविलें आहे.

**लक्ष्मी०**—म्हणून काय झालें. आपल्याला पहायला सवरायला नको कां ? खरें म्हणजे यंदा तिचें लग्न झालेंच पाहिजे.

त्रिंबक०—यंदा होवो नाहींतर पुढील वर्षी होवो. मी पहिलें पाऊल साफ टाकणार नाहीं. शिवाय तिच्या लग्नालाही मी जायचा नाहीं. किंवा लग्नाची निमंत्रणेंही मी करावयाचा नाहीं. तिनें लग्न जमवावें. हवीतर आपली संमति घ्यावी. लग्न उरकून घ्यावे व मग त्या उभयतांनीं आपल्या घरीं आपणां उभयतांना बोलवावें. आपण पाहुणी म्हणून जाऊं.

लक्ष्मी —म्हणजे तिला कांहीं हुंडाबिंडा नाहीं कां देणार !

त्रिंबक०—छट् ! पक्षांची पिलें उडण्यास समर्थ झाली कीं उडून जातात तसेच* यांचे. फक्त या मानवी पिलांना जन्मदात्या मातापितरांची ओळख राहते म्हणून त्यांनी हवें तर त्यांना मान द्यावा.

विमल०—हे पहा बाबा. यमुनामावशीचें व माधवकाकांचे सख्य घडवून आणण्याची अवघड कामगिरी मी करणार. त्याशिवाय मी मुळीं लग्नच करणार नाहीं. मधुकाका व यमुमावशी हीं दोघेंही मजवर तुमच्याप्रमाणें व आईप्रमाणेंच ममता करतात. त्यांच्याकडेच मी रहावयास जाणार आहे. यमुनामावशीचा कष्टाळूपणा व तिचें काकांवरील अंतस्थ प्रेम हीं निःसंशय अनुकरणीय आहेत. तीं शिक्षणाला आंचवल्यामुळें तिच्यांत आडमुठेपणा, हेकटपणा, हट्ट वगैरे गुण शिरले आहेत तें मी जरूर दूर

करीन. अंतःकरणांत गाढ प्रेम असून तें दाखवितां येत नाहीं अशी तिची स्थिती आहे. त्याचप्रमाणें तिला जमवून घ्यायचें ह्मणजे काय हें समजत नाहीं. मीही त्या उभयतांवर तुमच्या इतकेंच प्रेम करतें. मी तिला खात्रीनें सुधारीन कारण तिचें मजवर कन्येप्रमाणें प्रेम आहे. मग, काका मी जाऊना तिच्या-कडे रहायला? स्वतःच्या घरापेक्षां दुसऱ्या त्या घरींच शिक्षण नीट घेता येतें.

त्रिंबक०—जरूर जा. बरें आता वाचन वगैरें कोणतें करणार?

विमल०—बाबा, स्त्री आणि पुरुष या विषयावरचीं सर्व पुस्तकें मी वाचणार आहे. काहीं मी कॉलेजात वाचलीं आहेत. द्याल ना तीं मला आणून? बरं पण बाबा, विवाहसंस्थेविषयीं तुमचीं काय मतं आहेत?

त्रिंबक०—हें पहा, मनुष्याची सहजप्रकृति एकलकोंडेपणाची नाही. शिवाय मनुष्याचें काहीं ध्येय असलेच तर तें स्त्री व पुरुष या दोघांकडून सामुदायिकपणेंच पार पाडलें जाण्याचा जास्त संभव आहे.

विमल०—मी अविवाहितच राहिलें तर चालेल कां, बाबा?

त्रिंबक०—अविवाहित रहाण्यांत काहीं पाप आहे असें बिल-कूल नाहीं. पण एकतर तसें राहतां आलें पाहिजे. दुसरें विवाह करून संसाराच्या परिक्षेंत शून्य मार्क मिळवण्यापेक्षां अविवाहित राहून चाळीस मार्क

मिळवणें वाईट नाहीं. पण विमल, तुझ्यासारखी गृहिणी ज्याला मिळेल त्याला या संसार परिक्षेंत ८० । ९० मार्क मिळविल्या शिवाय राहयचे नाहींत. आणि हें ८० । ९० मार्क व्यक्तिशः उभयतांच्या पतिपत्नींच्या वांट्याला येत असतात. मात्र यापुढें मध्यमवर्गीतलि प्रत्येक स्त्री स्वावलंबनी व स्वसमर्थ झाली पाहिजे. तिला संततीही नियमीतच झाली पाहिजे. यापुढें अष्टपुत्रा सौभाग्यवतीभव असा आशिर्वाद न देतां एकाकी कन्यापुत्रवतीभव असाच साधा आशिर्वाद मी देईन.

लक्ष्मी०—भारीच तुम्ही विमलला चढवतां. आणि तीही फार जबरी बोलकी झाली आहे. मजपेक्षां लबाडीचा अंदा मावशीकडे अधीक दिसतो आहे खरा. विमा जरूर यमूकडे राहावयाला जा. मला तर त्या उभयतांचे गत आयुष्य पाहिलें कीं भरून येते. तूं जर त्यांचें ऐक्य करून दिलेस तर परमेश्वर तुला असा छान नवरा मिळवून देईल यँव रे ! त्या वामनची तुझी ओळख आहे कां ग ?

विमल०—आई तुझें आपलें कांहीं तरीच ! माझ्या लग्नाची सर्व जबाबदारी बाबानी उपवर-वधूवर-क्लब काढून अप्रत्यक्षपणें आपणाकडे घेतली आहे. एकीकडे मुलीला स्थळ पाहावयाची मी खटपट करणार नाहीं असें

म्हणायचे पण दुसरीकडून स्थळ तिच्या पायाशी येईल अशी योजना करायची असेंच ना बाबा?

**त्रिंबक०**—( हंसून ) होय तसें खरें!

**विमल०**—बरें बाबा, उद्यां उपवर-वधू-वर क्लबाची स्थापना नक्की होणार आहे ना?

**त्रिंबक०**—तर? उद्यां बरोबर चार वाजतां तेथें जावयाचें आहे हें लक्षांत ठेव. पुढल्या आठवड्यांत तूं मावशीकडे जाणार असेंच ना? [ सर्व जातात.

---

# अंक दुसरा

——×✻×——

## प्रवेश चवथा.

[ मंडळीं एका दिवाणखान्यांत जमली आहेत. सभेची मांडामांड उत्तम केली आहे. दोन बाजूला दोन उपहाराची टेबलें ठेवली आहेत. नुकतांच उपहार संपला आहे. बाजूला एक पेटी दिसत आहे सर्व तरुण पुरुष व स्त्रिया उत्तम पोशाखांत टाली आहेत. ]

**रा.सा.कात्रे०**—आज या वधूवर क्लबाची स्थापना झाली आहे. कोणाही वधूवरांना, प्रौढ कुमार कुमारी किंवा पुनर्विवाहेच्छू अगर विवाहेच्छू स्त्री पुरुषांना वा कुमार कुमारींच्या पालकांना या क्लबाचे सभासद

होतां येईल. वृद्धांनीं फक्त नजर ठेवायची; जरूर लागेल त्यावेळीं मदत करायची, यापलीकडे जास्त लुडबूड माझ्यासारख्यांनीं यांत करावयाची नाहीं. या क्लबामुळें विवाहेच्छू स्त्री-पुरुष एकत्र येऊन त्यांचें विवाह जमणें सुकर जावें हा या क्लबाचा उघड हेतु आहे. हें आम्हीं पूर्वींच जाहीर केलें आहे. आजच पटावर वीस सभासद नोंदले गेले आहेत. पांच विवाहेच्छू स्त्रिया, दहा विवाहेच्छू पुरुष पांच 'गार्डियन्' पुरुष. तरुण स्त्रीपुरुषांनीं येथें अगदीं मोकळेपणानें वागावें. या क्लबाचें वैशिष्ट्य व उपयुक्तता लवकरच सर्वांना कळून येईल अशी मला आशा आहे.

**विमला०**—हा क्लब आम्हां स्त्रियांना अत्यंत उपकारक होणार आहे.

**बॅ. रामचंद्र०**—या क्लबच्या निमित्तानें कुमारी शशिकला यांची व माझी ओळख झाली हें मी माझें भाग्य समजतों.

**सई०**—आमच्या सारख्या वृद्ध कुमारींना येथें आल्यानें कांहीं वेळतरी तरुण झाल्याप्रमाणें वाटेल खरें.

**सरदार०**—आतां येथें आणखी कांहीं कार्यक्रम व्हावा असें मी सुचवितों. खरंच विमलाताई, कांहीं पद वगैरे म्हणणार कां?

**विमला०**—फोनो लावा कीं. करमणूकच करमणूक [ फोनो

वाजत राहतो. ] रानारानांत गेली बाई शीऽळ । राना-
रानांत गेली बाई शीऽऽळ । [ फोनो थांबतो. ]

**शशिकला**०—खरंच विमल, तूं म्हण पद, मी पेटी वाजवतें.

**बॅ. रामचंद्र**०—पेटी अगदीं हळु वाजवा हं. गाणें म्हणणाराचा आवाज आम्हांला ऐकूं येऊं द्या.

**शशिकला**०—हें पहा मी पेटीवर पद वाजविते तुम्हां पैकीं कोणीतरी तें पद कोणतें तें ओळखा. [ वाजविते. ]

**ध ग म् प प प प रे नि ध नि ।**
**नी नी नी नी-नी सा नी सा ॥ नी रे सा ॥**

**शशिकला**०—समजलें कां—

**बॅ. रामचंद्र**०—त्यांत काय आहे. नाहीं मी बोलत नाऽऽथा ।

**वामन**०—छे ! आम्हांला नाहीं बोवा समजले.

**सरदार**—अहो तुम्हांला प्रेतें कशी कापावी हें समजतें पेटी कशी वाजते हें कसें समजणार तुम्हाला ?

**शशिकला**०—बरें विमल तूं म्हण.

**विमल**०—मी मला येईल तसेंच वेडेवांकडे मूकनायकांतलें पद म्हणून दाखविणार आहे.

[ विमल-शशीकलेच्या कानांत पद सांगते व ती पेटी वाजवूं लागते. ]

**सा र म् प ध्र म् प ग् रे ऽ रे ग् म् ग् रे सा ऽ**

**शशिकला**०—कोणते पद सांगा पाहूं—

**सरदार**०—उगीच कांऽकाऽन्ता ऽऽ

**बॅ. रामचंद्र**०—अहो विमलाताई मूकनायकांतलें पद म्हणत आहेत.

**पतित या देशा सोडवा ।**
**देवा धावा ॥ धृ ॥**

**विमला०**—[ म्हणूं लागते ]—

**पतित या ऽ देशा ऽ ऽ सो ऽ ऽ डवा ऽ ऽ ऽ**
**दे ऽ वा ऽ ऽ ऽ धा ऽ वा ऽऽऽऽऽऽऽऽऽ ।**
**व्याकुल ही सारी जनता ।**
**ऐक्य भावना ना मुळिं त्या ।**
**द्वेष हा सदा मनिं असता**
**बंधु सकल साधिति दावा ॥ १ ॥**

[ वामन स्वतःशीच डोलत राहतो. ]

[ सर्वजण—टाळ्या वाजवितात व वाहवा ! वाहवा ! ! म्हणतात. ]

नंतर फुलांचे गुच्छ व पेढे वाटल्यावर कार्यक्रम संपतो—व मंडळी जोडी-जोडीने हातांत हात घालून जातांत बॅ. रामचंद्रराव शशिकलेचा हात धरून जातात.

[ पडदा पडतो. ]

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ एका बाजूनें बळवंतराव व दुसऱ्या बाजूने घारुअण्णा प्रवेश करितात. ]

**घारु०**—कोण बळवंतराव ?

**बळवंत०**—कांरे घारुअण्णा, माझ्याकडे आज असा टकरेच्या हल्यासारखा कां बघतोस ?

**घारु०**—हें पहा, बाईसाहेबांनीं मला जेव्हां कारकुनाची नोकरी दिली, तेव्हां माझ्या एकट्याशींच लग्न करण्याचा त्यांचा विचार होता, पुढें तुम्ही त्यांच्याकडे आलांत आणि होतां होतां माझ्या सुखांत वांटेकरी झालांत. बरं प्रथम तुमची आणि बाईसाहेबांची ओळख करून देणारा मध्यस्थ मीच ! इतकं असून तुम्हींच मला भारी होऊन बसलां आहां तेव्हां——

**बळवंत०**—बरं ते राहूं दे, तुझं सध्याचं गृहसौख्य कसं काय आहे. अगदीं चैनींत आहेस तूं.

**घारु०**—[ मिशीला पीळ देत—स्वगत— ] या वकीलाला आतां सवतोबा मत्सर पछाडूं दे ! [ उघड ] वा: ! चांगलें चाललें आहे ! तुम्ही आणि मीना एकत्र नसतां तेव्हां ती आणि तीच एकत्र असतो ना !

**बळवंत०**—म्हणजे? गेले आठ दिवसांत मीनाक्षीची आणि माझी मुळीं गांठच नाहीं! म्हणजे ती काय तुलाच घेऊन बसली होती कीं काय?

**घारु०**—( स्वगत ) अस्सं! एकूण मीनाक्षीनं दोघांनांहीं हात दाखविला असें दिसतें. [ उघड ] हो, तर! उघडच आहे!

**बळवंत०**—कोर्टांतल्या या सावकारी खटल्याखालीं तर मी सध्यां अगदीं मेटाकुटीला आलों आहे. कोठला हिच्या पाशांत येऊन पडलो असं झालं आहे!

**घारु०**—बरें आहे, बळवन्तराव, तुमचं ताट रोजच्यासारखे पाठवून द्यायला सांगतों तुमच्या खोलींत. आज मी मिनीच्या खोलींतच जेवणार आहे. [ स्वगत ] मिनी, तर, मला खोलींत पाऊल देखील टाकूं देत नाहीं म्हणा. तिला आजारी पडायला काय झालं देव जाणे. बाहेरून ऐकावें त्यावेळीं "ओ, ओ," करीत असते. [ जातो. ]

[ मीनाक्षी प्रवेश करते; अशक्त व ओढलेली दिसते पण वरून मात्र आनंद दाखविते. ]

**मीनाक्षी०**—बळवन्तराव, गेले आठ दिवस मी अगदीं निजून काढले. कोर्टांतील काम नीट चाललें आहे ना? तुम्हांला भेटून जाण्याबद्दल घारोपंताबरोबर निरोप

पाठविला, तर तुम्हीं त्यांच्याबरोबर उलट निरोप पाठविला कीं फार कामांत आहे म्हणून. अगदीं मला भेटायलासुद्धां वेळ नाहीं.

**बळवंत**०—[ स्वगत ] अरे चोरा घाऱ्या; असे खोटे निरोप नेतोस आणि खरा निरोप मला सांगतही नाहींस ? आहेस बुवा! सवतोबा आहेस खरा [ उघड ]. तसं कांहीं नाहीं; कामें नटि चालली आहेत, आज रात्रीं कांहीं एकदोन मुकादम्याची चर्चा करावयाची आहे, तेव्हां म्हटलं येऊं ना आपल्या खास खोलीत ?

**मीनाक्षी**०—नको, आज नका येऊं; उद्यां मला बरं वाटेल. वाटल्यास खटल्याची "पोस्टपोनमेंट" ध्या. मी जज्ज साहेबांना चिठ्ठी देते. म्हणजे ते ऐकतील. त्यांची माझी चांगली ओळख आहे. तुमचं मात्र ऐकतीलच असं नाहीं. ही घ्या चिठ्ठी. [ बळवन्तराव चिठ्ठी घेऊन जातो. ]

**मीनाक्षी**०—माझा दोन नवरे करण्याचा प्रयोग फसणार कीं काय ? एका पुरुषानें दोन बायका करणें व एका स्त्रीनें दोन पती करणें यांत अंतर आहे खरं ! एक पुरुष दोन स्त्रिया वागवूं शकतो, पण स्त्रीविषयक मासिक व वार्षिक अडचण उपस्थित होतांच स्त्री मात्र एकालाही जवळ सुद्धां येऊं देऊं शकत नाहीं. द्रौपदीनं पांच यजमान कसें संभाळले श्रीकृष्ण जाणें !

**बळवंत**०—[ पुनः प्रवेश करून ] हें पहा, मीना, हें कांहीं चालावयाचें नाहीं. वांटणी बरोबर झाली नाहीं. घारुआण्णालाच विशेष सवलत कां म्हणून?

**मीनाक्षी**०—बळवंतराव, अहो, तुम्हांला असं झालंय् काय? मीच मुळीं जर आजारी आहे, तर तुमची गैरसोय व्हायचीच, त्याबद्दल तक्रार करून कसं चालेल?

**घारु**०—[ एकदम प्रवेश करून ] बाईसाहेब, तुम्हीं बळवंतरावाशीं एकट्याशींच काय ह्या गुलगुल गोष्टी चालल्या आहेत मला बाहेर घालवून? असा पंक्तिप्रपंच चालायचा नाही. [ हाताने मारण्याचा अभिनय करून ] मी बळवंतरावांना आतांच बजावतों कीं, असेंच चालत राहिल्यास मी त्यांचा कांटा काढल्याशिवाय रहाणार नाहीं. अशी गैरसोय सहन करण्याकरितां कांही मी लग्नाला संमति दिली नाहीं. रोज उठल्या सुटल्या फाक्या हा काय प्रकार?

**मीनाक्षी**०—हें पहा घारुअण्णा, सध्यां कोर्टाच्या कामाकडे जरा विशेष लक्ष द्या. उघ्राणी भारीच व्हायची आहे. बळवंतरावांना सध्यां सर्व कोर्टाचें काम सांभाळावें लागतें हें लक्षांत ठेवा. आईचें काम नीट करीत जा. आतांशा मला बरं वांटत नाहीं हें तुम्हांला

दिसत नाहीं. चला जा; आतां मला जरा स्वस्थ पडूं द्या.

[ बळवंतराव व धारुअण्णा दोघेही एकमेकांवर दांत खात जातात. ]

# अंक तिसरा

## प्रवेश दुसरा

[ यमूताई व माधवराव बोलत आहेत. ]

[ यमूताई, तांदूळ निवडीत जांभया देत बसल्या आहेत. मधून मधून तांदूळ निवडतात पुन्हां जांभया देतात. ]

**माधव०**—अहो जरा पडत कां नाहीं. थोडी विश्रांति घ्यावी. अशक्त माणसाला विश्रांतीची जरूर असते. दुपारीं झोंप घेतली ह्मणजे रात्रीं जरा हुशारी राहते.

**यमु०**—करायची काय रात्रीं हुशारी. पुरुषांनीं घरांत इतकें बारकाईनें पाहूं नये.

**माधव०**—खरेंच पाहूं नये, पण केव्हां—सर्व सरळ सुव्यवस्थित चाललें असेल तेव्हां.

**यमु०**—बरें, चहा घेणार ना ?

**माधव०**—[ विचारांत गर्क असतो. ] हुं.

[ यमूताई आंतून चहा आणून टेबलावर ठेवतात. ]

माधव०—हें पहा, एकंदर चालला आहे हा प्रकार कांहीं बरा नव्हे. माझा स्वभाव हा असा संतापी; आपणहि माझं कांहींएक म्हणून ऐकायच नाहीं असं ठरवलं आहे. उगीच लोकांना कां मजा ? तुह्मांलाही त्रास झालेला मला पहावत नाहीं. मी आपला पुन्हा खाणावळींत जेवायला जातो. माझ्यासारख्या दरिद्री माणसाशीं पटवून तें काय ध्यायच आहे हें तुमचें मनोमनींचें म्हणणें मला पटतें पण त्याला काय इलाज ? आपणच सांगा, मी परवां काय वाईट सांगत होतों ? परवांच काय पण गेलीं दहा वर्षे मी काय तुम्हांला वाईट सुचवित आलों ?

यमु०—[.एकदम चेहरा उतरून. ] खरंच चुकलं खरं माझं.

माधव०—म्हणजे असंच उद्यां चुकणार परवां चुकणार असेंच नाहीं का ? गेलीं दहा वर्षे हेंच आपलें उत्तर आहे; मी सांगायचें आणि तुम्हीं ऐकायचें. माझें काय नुकसान होईल तें होऊं दे लोक हंसणार तर मला हसूं देत; करतां कां असें ? करतां कां कबूल की मी म्हणेण तसें अक्षरशः वागेन.

यमू०—[ पुनः मूळ पदावर येऊन ] पण मी म्हणते तसं वागलं तर नाहीं का चालायचं ? [ डोळे पुसते. ]

माधव०—हें पहा, तुम्हांला अक्कल असती तर तुमचें

म्हणणें ऐकलें असतें, पण ती माझ्या दुर्दैवानं तुम्हांला नाहीं आणि ही गोष्ट तुम्हांला अजूनहि समजत नाहीं हें माझें दुर्दैव. तेव्हां तें कांहीं नाहीं आजपासून तुमची आमची काडीमोड. कायद्यानें नव्हे मनोमनीं. तुम्हांला काडीइतका त्रास झाला तरी मला दुःख होतें, पण मी काय करूं? स्वतः मला दुखवितां आणि स्वतःला दुखवून घेतां. मला दुख-वून तरी तुम्हीं आनंदी रहातां कां? राहा; तुम्हांला आनंदी पाहून मी सुखी होईन. तुमचं अगदीं लहान मुलासारखं होत आहे. आधीं स्वतःच वस्तु हरवा-यची, आणि हरवली म्हणून रडायचं आपणच.

यमू०—( डोळे चोळीत ) खरंच मी मरायला हवं आहे, पण तें होणार कसं? ती काय कीडामुंगी आहे कीं चिरडून टाकून मोकळं व्हावं?

माधव०—असें कोण म्हणते. उलटे आम्ही म्हणतो कीं, आनंदी रहा. बऱ्या व्हा. मनांतला किंतू टाका व आम्हाला अगदीं तुमच्या मुठींत ठेवा. आम्ही मुठींत राहूं पण केव्हां. इतर सर्व सुव्यवस्थित असेल तेव्हां ना?

यमु०—हे पहा तुम्हांला जर सईताईशी लग्न करायचें असेल तर बेलाशक करा. तेवढ्याकरतां कारण शोधायला नको?

माधव०—पुन्हां हा आचरटपणाचा प्रश्न पुढें आणतां? मूळ ज्यामुळें

हा प्रश्न थट्टेत उत्पन्न झाला त्याचे मूळच कां नाहींसे करीत नाहीं. तुम्ही करा कबूल मी सांगेन तसे वागायचें. पतीला तुम्ही जुन्या वळणाच्या स्त्रिया देव समजतांना.

यमु०—माझें मुळीं नशीबच फुटकें— [ डोळ चोळते ]

माधव०—पुन्हां खरा प्रश्न मागें राहिला.

यमु०—[ अधिकच डोळे चोळूं लागते. ]

माधव०—हे पाहिलं ? या गंगा—यमुना वाहूं लागल्या कीं त्याच्या ओघांत आम्हीं जातों वाहून पण तुम्ही माझ्या म्हणण्याला रुकार काहीं देत नाहीं. [ ती हुंदका देऊन रडूं लागते माधवराव गहींवरून ] बरें मी चहा घेऊंना, मग तुम्ही दूध घ्या पाहूं. जा आणा दूध. [ ती आत जाते. विमल प्रवेश करते. ]

विमल०— काका, दूध मलाही पाहिजे हं. मी सुद्धां मावशीप्रमाणं चहा सोडला आहे.

माधव०—कोण विमल, ये कीं. मुंबईहून केव्हां आलीस ? परिक्षा झाली ?—पेपर्स कसे काय गेले ? कां आतां लग्नाविघ्न करायचं कीं नाहीं ? [ यमूताई दूध घेऊन येतात. ]

यमु०—[ विमलला पाहून डोळे पुसून ] कोण विमा, चल आंत, तुला दूध देतें. अग आलीस केव्हां ?

विमल०—अगं झाले दोन दिवस

यमु०—मग आज यायला फावलं मजकडे?

विमल०—अग रागावूं नको आतां अगदीं तुला कंटाळा येई-पर्यंत तुझ्याकडे राहणार आहे.

विमल०—बरं, चल.

माधव०—( चहा पिऊन ) बरं, विमल, आतां तूं आली आहेस तर यांना जरा इकडच्या तिकडच्या, तुझ्या कॉलेज-मधल्या जमती गमती सांग. अगदीं इंग्लंडमधील गमती घाल तिच्या कानावर. मी बाहेर जातो बरें कां?

[ जातात व पडदा पडतो. ]

[ विमला, शशिकला, त्रिंबकराव व लक्ष्मीबाई. बोलत बसली आहेत. ]

विमल०—बाबा, सध्याचें युग क्लबांचें आहे. आम्हीं अविवाहित मुली आणखी एक क्लब काढूं इच्छितो. तुम्ही अध्यक्ष झाले पाहिजे.

शशीकला०—खरेंच, विमल म्हणते तें खरें आहे. आजच्या काळांत धूम्रपान हें शिष्टसंमत व्यसन समजलें जातें इंग्रज बाया तर आपल्या पतीची सिगारेट काडी ओढून स्वतः पेटवतात व पतीही सिगारेटचा धूर पत्नीच्या तोंडावर सोडूं शकतो.

विमल०—इश्शं? मला तर ओकारी येईल पण आई म्हणते कीं इतकें सोंवळें होऊन चालायचें नाहीं; मग पुढच्या आयुष्याची पूर्व तयारी म्हणून पुरुषांचें धूम्रपान सहन करण्याची संवय नको कां व्हायला?

त्रिंबक०—बरें मग उद्यापासून मीच सिगारेट ओढूं लागतो म्हणजे तुला संवय होईल.

शशीकला०—काका आम्हींच सिगारेट ओढावयास सुरवात केली तर ?

विमल०—बाबा अविवाहित कुमारींकरितां आम्हीं धुम्रपान-क्लब काढूं कां ? आज फक्त तुमचा सल्ला घेत आहों. तसा क्लब काढला म्हणजे आम्हांला ही संवय होईल. आईच्या म्हणण्याप्रमाणें अगदीं सोंवळें राहून चालणार नाहीं असें खरे ना ?

लक्ष्मी०—विमल, अग तुम्ही पोरी बोलतां तरी काय ? तुम्हीं उद्यापासून सिगारेट कां ओढूं लागणार ?

त्रिंबक०—मग काय झालें. आम्ही पुरुष जर सिगारेट ओढणार तर आमच्या बायकांना त्याची संवय नको व्हायला.

लक्ष्मी०—अहो पण आज तंबाकू ओढणारे अनेक पुरुष आहेत म्हणून त्यांच्या बायका सिगारेट्स ओढूं लागल्या आहेत कां ?

त्रिंबक०—हे बघा मला सुद्धां आश्चर्य वाटते कीं हें होतें कसें ? धूम्रपान करणारे लोक जर स्वच्छ राहात असतील त्यांच्या तोंडाला जर घाण येत नसेल तर माझें कांहींच म्हणणें नाहीं.

विमल०—बाबा खरें सांगू आम्ही आजच कांहीं सिगारेट्स ओढण्याची सुरवात करीत नाहीं पण एक एक

चळवळ सुरू करून ठेवावी असें आम्हांस वाटतें. यामुळें कांहीं झाला तर फायदाच होईल.

त्रिंबक०—बरें सध्यां तुम्ही या प्रश्नाची चर्चा आपापसांतच करा. दाम्पत्याचें जीवन नीट चालावयाला हा प्रश्नही विचार करण्यासारखा आहे खरा! या क्लबांत यमूताईसारख्या बायका येतील असें करा. धूम्रपान क्लब असें नांव देऊं नका. आज ८० टक्के गृहिणी यमूताईसारख्या आहेत आणि त्याच सुधारल्या पाहिजेत.

विमल०—म्हणजे आम्ही क्लब काढावा पण जाहीर धूम्रपान क्लब असें नांव देऊं नये एवढेंच ना? या क्लबांत यमूमावशीला मी जरूर आणीन.

त्रिंबक०—या तुमच्या क्लबाला 'धूम्रपान-प्रतिबंधक-क्लब' असें नांव द्या म्हणजे यमूमावशी जरूर येईल.

विमल०—बाबा एक पाहिलेली गंमत सांगते हं मग तुमचा अभिप्राय द्या.

शशी०—विमल तूं तर आतां आख्यानच लावूं लागलीस.

विमल०—ऐक ग. बाबा एक दिवस पाऊस मारे पडत होता. एक तीशीचे गृहस्थ हातांत छत्री धरून ऐटीनें चालले होते. त्यांच्याच पुढें त्यांची पत्नी भिजत झपाट्यानें चालली होती. नवरा तिला छत्रींत ये म्हणेना किंवा ती त्याच्या छत्रींत येईना खरें काय होते ईश्वर जाणे.

शशी०—अग संपली ना कथा. चल आतां.

विमल०—अग खरी गंमत तर पुढेंच आहे. इतक्यांत मागून एक पारशी गृहस्थ येत होता. पारशी लोक स्त्री दाक्षिण्याबद्दल प्रसिद्धच आहेत. त्या पारशी गृहस्थानें त्या बाईवर छत्री धरली व तो तिजबरोबर झपाझ्यानें चालूं लागला ती बाई आणखी झपाझ्यानें चालूं लागली. ती लाजेनें अगदीं मरणप्राय झाली. व पतीराज अगदीं लालीलाल झाले. आहे कीं नाहीं गंमत.

त्रिंबक०—पण यांत मूळ दोष कोणाचा ?

विमल०—त्या गृहस्थाचा. त्यानें बायकोला छत्रींत घ्यावयाचे होते.

त्रिंबक०—पण ती तर नवऱ्याच्या छत्रींतून चालण्यास कबूल नसली पाहिजे.

विमल०—पण मग तिला पारशी गृहस्थाच्या छत्रींतून चालावें लागले ना ?

त्रिंबक०—विमल, हा त्या बाईचाच दोष नव्हे कां ?

शशी०—काका, मी पण आणखी एक घरगुती गंमत सांगते हं. मी कावेरांकडे गेले होते जेवायला. जागा लहान. एकाच जागेवर दोनतीन वेळा मंडळी जेवायला बसायची होती. मी खास मैत्रिणबिरोबर बसणार म्हणून मागे राहिले होते. एक पंगत उठली. शेण गोळा फिरला गेला व त्याच जागेवर पुन्हा पत्रावळी मांडल्या. शेणाची घाण मारे येत होती. इतक्यांत कावेरीचे

यजमान घरी आले. त्यांचें पान मांडलें व मी ही त्यांचे बरोबरच जेवायला बसण्याचें ठरविले. कावेरीला तें आवडलेलें दिसलें नाहीं; त्यांना शेणाची घाण येताच त्यांनीं कावेरीला हांक मारली. अहो, इकडे या. शशीताईंना पुढें पाट ठेवा. म्हणजे शेणाची घाण येणार नाहीं. मला पाट पुढें ठेवला गेला. मी माझ्या बसूं खालचा पाट काढला आणि कावेरीच्या यजमानांच्या पानाखालीं घातला. कावेरी चडफडूं लागली. मी हसत म्हटले. अग खरेंच एक वेळ बसायला पाट नमला तरी चालेल. पण पानाखालीं पाट ठेवावा हे बरें नाहीं कां नाना ?

विमल०—शशीताई, इतका व्यवहारीपणा आम्ही दाखविला मग आम्हीं 'हिंदू' कसले ?

शशी०—हा प्रकार झाल्या दिवसापासून कावेरीं मजजवळ बोलत नाहीं. यजमानाजवळही तिची धुसफूस चालते असें तेंच सांगत होते काय करावें या कर्माला ?

त्रिंबक०—खरेंच किती साधा प्रश्न ? पण तोही चटकन् सुटूं नये ना ?

लक्ष्मी०—आपण ताटाखालीं पाट ठेवण्याची सुधारणा जरूर करणार.

त्रिंबक०—नेहमीं ठेवा किंवा ठेवूं नका. घाण असेल तेव्हां तरी ठेवा. निदान पान—पत्रावळीखालीं तरी ठेवा. शेणा-

च्या थरावर तरी पाहुण्यांना जेवायला बसवूं नका. नाहींतर केशरी भाताच्या सुवासाबरोबर शेणाची घाण लावताहेत तोंडी.

**विमल०**—पुरे बाई उशीर झाला चला आतां.

[ जातात. ]

---

# अंक तिसरा.

—×✻×—

## प्रवेश तिसरा.

[ यमूताई वाती करीत बसल्या आहेत. विमल कोठें बाहेर गेली आहे. वेळ दुपारी ४ ची. ]

**सई०**—काय चाललें आहे आक्का ?

**यमु०**—कांऽऽहीं नाहीं ! माझ्या मागं काय आतां लहान पोरांचा लबेदा-आहे कां आणखी कांहीं आहे ? जेवायचे डबेसुद्धां आम्हीं हल्लीं खानावळींतून आणतो. विमल कालपासून आली आहे ती गेली आहे बाहेर. माझें आजारीपण चाललेंच आहे.

**सई०**—अग, चालायचंच ! आजारी कोणी कां पडत नाहीं त्यांत एवढी खंत कसली.

**यमु०**—पण काय ग? आज तुला वेळ कसा काय मिळाला !

सई०—कांहीं नाहीं, वेळ कसला? तुझ्याबरोबर कांहीं बोलायचं आहे म्हणून मुद्दाम तर आले आहे.

यमु०—खरंच? काय काय आहे बाई तुला एवढं माझ्याजवळ बोलायचं? मी काय सुशिक्षित आहे कां पुस्तकं वाचतें?

सई०—असलें खवचट बोलणें कशाला, अग, परवां माधवरावांचें आणि माझं काय बोलणं झालं तुला आहे कां ठाऊक? समजले कां तुला? काय बाई पुरुष तरी?

यमु०—हो! तूं म्हणे माझी सवत होणार आहेस. बाकी माझ्या मरणाची वाट पाहण्यापेक्षां मी जिवंत असतांनाच तुमचं लग्न झालेलं बरं!

सई०—हो, तुझ्या मरणाची वाट पहाण्यापेक्षां तुझ्या देखत आणि तुझ्या संमतीनें माधवरावांचें दुसरें लग्न झालें तर बरें! एखाद्या स्त्रीच्या मरणाची वाट पहाणें हें फारच भयंकर! पण मी त्यांना उघड उघड स्पष्ट दिलेला नकार नाहीं कां आला तुझ्या कानावर?

यमु०—सईताई असलीं वरवरलीं बोलणीं समजतात हो, पण उघड स्पष्ट का बोलत नाहीं. मी केव्हांच परवानगी दिली आहे. [ आवाज बदलून ] बरं ते राहूं दे, तूं चहा घेणारना?

सई०—अग, हो, घेणार तर, पण थांब, माझें बोलणें पुरें ऐक, खात्री करून घे, अन् मग दे चहा आनंदानें.

यमु०—हें बघ; त्यांच्या वर्तनांत फरक दिसेपर्यंत मी तरी तुझ्या बोलण्यावर विश्वास कसा धरावा ?

सई०—[ स्वगत ] आतां जरा कडक भाषा वापरल्याशिवाय भागणार नाहीं ! [ उघड ] अग हें बघ; मी बी ए. त्यांची माझी योग्यता सारखीच कां ? मी म्हणते यांना मला हा प्रश्न विचारण्याचा धीर तरी कसा झाला ?

यमु०—हें बघ, योग्यतेचा प्रश्न तूं काढलास म्हणून बोलते; समज उद्यां त्यांच्या हाताखालीं एखादा बी. ए. राहिला नोकरीला, तर तूं नाहीं कां त्याच्याशीं लग्न करणार ? बी. ए बायांनीं आपल्यापेक्षां कमी शिक्षणाच्या माणसाशीं लग्नं केल्याच्या कित्येक गोष्टी याच पुण्यांत मी पाहिल्या आहेत. तुझ्याच मैत्रीणींचा दाखला घे. त्यांच्यापेक्षां बी. ए. ची योग्यता अधिक, असं मला नाहीं वाटत. त्यांच्या इतकी कर्तबगारी कित्येक बी. ए. लोकांमध्यें सुद्धां पहावयास मिळत नाहीं.

सई०—[ स्वगत ] बिचारीला पतीबद्दल काय अभिमान वाटतो आहे ? पण काय चमत्कारिक स्वभाव आणि जोडीला आजारीपण ! [ उघड ] बरं, ते राहूं द्या, मी यापुढें त्यांच्याशीं बोलणारसुद्धां नाहीं. मग तर झालं ? मी तरी आणखी काय करणार ?

यमू०—हें बघ, तुझ्याविषयीं थट्टेंतसुद्धां असंच बोलणं चालें सुशिक्षित पुरुषसुद्धां गूण व शिक्षण यांना मान न देतां रूपालाच अधीक मान देतात याचा त्यांना नेहमीं राग येतो कित्येक बी. ए. लोकांजवळ त्यांनीं तुजकरितां शब्द टाकल्याचें मला माहीत आहे. पण त्यांना पाहिजे रूप ! म्हणून एकदां ते मला म्हणाले, 'मी करूं कां ग सईबाईशीं लग्न ? तुलाही घरांत मैत्रीण होईल. बरं, त्यांत तुझेंहि कांहीं नुकसान नाहीं; तुझ्या हक्काला बाध तर कांहींच यायचा नाहीं. झालं; हा थट्टेंतलि वाद पण त्यावर तुझ्याजवळ बोलण्यापर्यंत पाळी यावी ? मला नाहीं ग बाई असं कधीं वाटलं.

सई०—बरं; जाऊं तर ? मी तुझ्या आड कधींच येणार नाहीं असं तुला वचन देतें. जाते हं !

द्वारका०—बरं, चल तर आंत; चहा पिऊन जा—[ जातात. ]

# अंक तिसरा

## प्रवेश चवथा

[ हणमंतराव, त्रिंबकराव, विष्णुपन्त बोलत बसले आहेत. ]

**त्रिंबक०**—काय माधवराव, तुमच्या कुटुंबाची तब्येत कशी काय आहे ?

**माधव०**—बरी आहे; त्या थोड्या मोकळया हवेंत जातील, चार मंडळींत मिसळतील सवरतील तर सुधारतील. आपल्या या क्लबांत या म्हणून म्हणतों आहे पण नाहीं त्यांना तें अजून पटत.

**त्रिंबक०**—काहो माधवराव, सध्यां एक बायको जिवंत असतां दुसरी बायको करण्याचें खूळ काय माजत चाललें आहे.

**विष्णु०**—असें चाललें आहे खरें, पण आपण जी विवाह-विषयक चळवळ क्लब काढून चालविली आहे त्यामुळें हे प्रकार कांहीं काळानें बंद होतील.

**त्रिंबक०**—हा झाला दहा वर्षांनीं रोगराई टाळण्याचा व रोगराई बंद करण्याचा उपाय. पण सध्यांच ज्यांना दुसऱ्या लग्नाचा रोग होत आहे त्यांचा रोग कसा काय बरा करायचा ?

**विष्णु०**—त्रिंबकराव आपण या माधवरावांचीच गोष्ट घेऊं;

गेलं वर्षभर बायको आजारी बरें प्रत्येक बाळंतपण म्हणजे पुनर्जन्म. यांनीं. दुसरं लग्न केलं तर काय हरकत? बायकोची संमति घ्याची म्हणजे झालं.

त्रिंबक०—पण बायकोची परवानगी न मिळेल तर? माधवरावाना तर यमुताई कधीच परवानगी देणार नाहींत. आतां हा प्रश्न आपण उलट बाजूनें विचारास घेऊं; समजा एखादा पुरुष एक वर्षभर आजारी आहे; त्याच्या बायकोनें काय करावें? या तुमच्या प्रश्नाचें उत्तर तेंच त्या प्रश्नाचें उत्तर.

माधव०—हे पहा, मी व्यक्ति सोडून या चर्चेत भाग घेतों. सध्या या प्रश्नाची चर्चा पुरुषांच्या दृष्टीनें करूं. उद्या बायका इतक्या वरचढ स्थितीला आल्या कीं त्यांचा विचार करूं. त्या मिनाक्षीचा प्रयोग तर आपण पहातच आहां. एका पुरुषानें एकापेक्षां अधिक बायका केल्याचीं उदाहरणें आहेत. मात्र द्रौपदीशिवाय अनेक नवरे केल्याचें ऐतिहासिक वा पौराणिक उदाहरण नाही. द्रौपदीचें उदाहरण म्हणजे कविकल्पना असण्याचाही संभव आहे. दर महिन्याला ती अग्निदिव्य करी; ही कविकल्पना नव्हे तर काय? लग्न संस्था मान्य करूनच आपण पुढें बोलूं; सध्या, बळवंतराव वकिलांचेंच उदाहरण घ्याना. तो तर बिचारा अगदीं त्रस्त होऊन गेला आहे; यांत स्त्री

पुरुषांच्या नैसर्गिक शरीर रचनेचा अवश्य व जरूर विचार केला पाहिजे. पुरुषाचा कामविकार वर्षाचे तीनशें पासष्ट दिवस जागृत असतो, तर स्त्रियांचा कामविकार गर्भ धारणेनंतर नष्ट होतो तो मूल पुनः आठदहा महिन्याचें झालें म्हणजे जागृत होतो. या गोष्टीचा विचार करावयास नको कां?

त्रिष्णु०—बरं पण या संतती नियमन प्रकरणाविषयीं तुमचं काय मत आहे? या उपायानें हा द्वितीय विवाहाचा प्रश्न मिटणार नाहीं का?

त्रिंबक०—विष्णुपन्त, तुम्हीच का हा प्रश्न विचारीत आहां? तुमच्या सारखे संतति–नियमनाची चर्चा–सुद्धां करूं न देणारे कित्येक लोक खाजगी येऊन मला उपाय विचारतात, याची तुम्हांला जाणीव आहे कां?

माधव०—खरंच पण हा संततिनियमनाचा प्रश्न मोडवायचा कसा? विवाहित स्त्रीपुरुषांस योग्य तो सल्ला देणाऱ्या डॉक्टरिणी आहेत कोठें? तुमच्या विमलला तुम्ही डॉक्टर कां केली नाहींत? अजून पाठविता का तिला मेडीकल कॉलेला.

त्रिंबक०—तिचा आतां आणखी कॉलेजांत जाऊन शिकण्याचा विचार नाहीं. पण तिनें या विषयाचा हवातर अभ्यास करावा असा सल्ला मी देईन. संतति हवी पण ती नियमित हवी हें खरें. साठ रुपये मिळव-

णाऱ्या मास्तराला सात मुलें असलीं तर तीं योग्य तऱ्हेनें वाढविणें कधींहि शक्य नाहीं. जन्म वाढले मृत्यू वाढले एकूण एकच. त्यापेक्षां दोनच मुलें पण तीं सुदृढ, सुशिक्षित व उद्योगीं निघालीं तर किती चांगलें होईल! स्त्रियांची तब्येतहि बरी राहील. स्त्री डॉक्टरणींनीं हा प्रश्न हातीं घेतला पाहिजे.

**विष्णू०**—छे बोवा! हें कांहीं पटत नाहीं.

**माधव०**—हें पहा. जगांत नियमनाविरुद्ध बोलणारा संतति नियमनाचें साहित्य बाळगणारा असण्याचा विशेष संभव असतो. धर्मनिष्ठ, सनातनी म्हणविणाऱ्या शंकरमामंजींचें चित्र कै. हरिभाऊनीं रेखाटलेलें तुम्हीं वाचलें नाहीं कां?

**त्रिंबक०**—हें पहा, जुने सनातनी, नवे सुधारक असा प्रश्नच काढूं नये. चांगली गोष्ट पण नव्यानें पुढें आली कीं तिला विरोध करायचा पण मागून तिचाच स्वीकार करायचा हा मुळीं मनुष्य स्वभावच आहे. तेव्हां याबद्दल कोणी कोणावर टीका करण्याचें कारण नाहीं. समाजांतील नीतितत्वें परिस्थिती-प्रमाणें बदलत असतात.

**माधव०**—[ स्वगत ] आतां हा विषयच बदलावा. [ उघड ] अहो, गंमत म्हणून सांगतो. कित्येक तरुण सुशि-क्षित पदवीधर मुली, प्रथम बिजवर वर नको म्हणून

नाकं मुरडीत असतात, पण अखेर बिजवरांच्याच गळ्यांत माळ घालतात. आहे कीं नाहीं मजा?

विष्णू०--वा, माधवराव विषय चांगला बदललात. बरें, त्रिंबकराव, तुमचा तो वधूवर-क्लब तुमच्या मुलीला वर पाहून देतो कीं नाहीं?

त्रिंबक०--जरूर; त्या क्लबाचा फायदा उपवर आणि उपवधू, कुमार कुमारींना तसाच विधुर स्त्री-पुरुषांना अवश्य होईल.

बळवंत०--[प्रवेश करून] वा मंडळी, वाद तर ऐनरंगांत आला आहे अगदीं.

विष्णु०--कां बळवंतराव, तुम्हीतर अचाट प्रयोगांत आपणांला अडकवून घेतलं आहे. बाकी मीनाक्षीनें प्रयोग पण प्रयोग केला आहे.

बळवंत०--झालंय खरं असं; पण मी त्या घारुअण्णाला युक्तीयुक्तीनें पळ काढायला लावणार आहें.

[ विष्णुपंत व हणमंतराव एकमेकास टाळी देतात. ]

बळवंत०--करा, बोवा, माझी थट्टा! झालंय खरंच प्रकरण थट्टा करण्याजोगं.

[ जातात. पडदा पडतो. ]

## विश्रांति.

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

[ डॉ. वामनराव व विमल समोरासमोर प्रवेश करितात. ]

**वामन०**—कां विमलाबाई, क्लबाचा कार्यक्रम बरा झाला, नाहीं ? गावांत फार दंगल उडून गेली आहे आपल्या क्लबमुळें.

**विमल०**—असं चालायचंच. अहो एक एक लग्न जमविण्याच्या गंमती पहा ! नागपूरहून एक गृहस्थ येतो, मुलगी पाहातो, वरचा चेहरा त्याला पसंत पडतो, लग्न करतो अन् निघून जातो पुढं त्याला महिन्या-भरानं आढळून येतं कीं स्वभाव पटत नाहीं. पण महिना दोन महिने बोलणं चालणं झालं असते तर ! अहो एकादा व्यापारी सुद्धां देवघेवींत एवढी घाई करीत नसेल !

**वामन०**—बरं, तुमचे पेपर कसे काय बरे गेले आहेत म्हणतां ? होय ना ?

**विमल०**—होय, बरे गेले आहेत.

**वामन०**—मग काय आतां एम् ए. होणार ?

**विमल०**—अं: एम्. ए. झालं तरी पुढें काय ? परिक्षा देणं एवढीच मी आयुष्याची इति कर्तव्यता समजत नाहीं.

तेव्हां तसा कांहीं विचार नाहीं. मी आतां एक वर्ष जगाचें निरीक्षण करणार; या वेळांत पुढील आयुष्याची थोडी पूर्वतयारी करणार. तडकाफडकी विवाहबद्ध होण्याचाही विचार नाहीं. कॉलेजचा उंबरठा ओलांडला कीं विवाहाचा उंबरठा चढला, असं करण्याचा कांहीं माझा बेत नाहीं.

**वामन०**—सुवर्णमालिनी म्हणे नुकतेच विलायतेहून आलेले I. C. S. भगवान् यांच्या बरोबर. लग्न करणार आहे.

**विमल०**—गावांत तो विषय झाला आहे खराच चर्चेचा, पण पहावें काय होतें तें. वास्तविक एवढ्यांत त्यांनीं लग्नाची घाई करूं नये. विवाहापूर्वी पुरुषांची तरी वैद्यकीय परीक्षा होणें जरूर असें मला वाटूं लागले आहे.

**वामन०**—का हो !

**विमल०**—सातआठ महिने झाले माझ्या मैत्रिणीचें लग्न झालें. आता ऐकतें कीं ती फार आजारी आहे. तिला औषध चालू आहे आणि तिच्या नवऱ्यालाही औषध चालू आहे.

**वामन०**—का हो नवऱ्याला का औषध ?

**विमल०**—[ हसून ] ती बरी झाल्यावर पुन्हां आजारी पडूं नये म्हणून.

**वामन०**—खरेंच पुरुष फार दिवस अविवाहित राहूं लागले कीं हा एक नवाच प्रश्न उपस्थित होणार खरा !

विमल०---बरें तुमचा पुढचा बेत काय ?

वामन०---मी डॉक्टरीची प्रॅक्टिस येथेंच सुरू करावी असें म्हणतो.

विमल०---फार छान ! पण हॉस्पीटलमध्यें अगर एकाद्या चांगल्या डॉक्टरच्या हातांखालीं एकादें वर्ष काम कां करीत नाही ?

वामन०---खरोखर डॉक्टरकडे उमेदवार राहावें असें माझें मनांत नाहीं. एकदम धंद्याला सुरवात करावी असें म्हणतो.

विमल०---हे पहा उमेदवारी करण्यांत फायदा आहे; रोग्यांच्या दृष्टीनंहि ते बरं. नाहीतर नवा डॉक्टर करतो प्रयोग अन् रोगी त्या प्रयोगांतच मरतो. रोगी मेला तरी त्याची दाद ना फिर्याद कारण तो डॉक्टर रजिस्टर्ड असतो. बरें वांचलाच तर ह्या प्रयोगांचा खर्च त्याच्या डोक्यावर बसायचा ! म्हणजे त्या रोग्याचें पुन्हां मरणच.

वामन०---कां अगदीं डॉक्टरांवर शस्त्र धरलं आहे.

विमल०---छे ! छे ! कोणत्याही असल्या धंद्यांचें प्रथम असेच. वकील काय करतों हेंच. खरा कायदा तो अशीलाचे पैसे घेऊनच शिकतो.

वामन०---आहे खरे तुमचे म्हणणें विचार करण्यासारखें.

विमल०---पहा. माझें म्हणणें पटलें तर विचार करा.

वामन०---बरे कांहीं दुसरी गोष्ट बोलावी असं मनांत येतं आहे, बोलूं कां ?

**विमल०**—आहो, बोलायला कचरतां कां? बोलावं बोलावं असं मन द्विधा होणं कांहीं बरं नव्हे. तुमच्या वाणींत माधुरी आहे खरी.

**वामन०**—तुमच्या संगतींत मला विशेष आनंद होतो असं वाटूं लागलं आहे.

**विमल०**—कां? त्या शशीकलेची आणि तुमचा कांहीं दिवस मैत्री होती ना?

**वामन०**—मैत्री अजूनहि आहे. पण तिच्याशीं तुमच्या इतका मी कधींच मन मोकळा बोलूं शकलों नाहीं.

**विमल०**—म्हणजे तिच्याशीं विवाह करण्याचें आपलें मनांत कधींच आलें नाही असेंच ना?

**वामन०**—असं कांहीं नाहीं, विचार आले पण वाढीला लागले नाहींत एवढेंच!

**विमल०**—खरंच, प्रेम म्हणजे काय व तें वाढीस कसें लागतें?

**वामन०**—प्रश्न कठीण आहे. कादंबऱ्या या शब्दाचें विवेचन करतात, पण खऱ्या प्रेमांत वैषयीक प्रेमाचा समावेश होतोच असं मला वाटत नाहीं. मातेचें निष्काम प्रेम किंवा पित्याचें निष्काम प्रेम तेंच खरें प्रेम, अन् तें खरे प्रेम, परत प्रेमाचीसुद्धां अपेक्षां करीत नाहीं. शिव्या देणाऱ्या मुलांचेंसुद्धां बरं व्हावं म्हणून धडपडणारी आई व बाप यांच्याच प्रेमाला मी तरी, खरं प्रेम म्हणतो.

**विमल०**—परवां रघुनाथ आणि शांता यांचं लग्न फिसकटलं हें समजलं कां ? त्या उभयतांनींहि नोटीसा दिल्या आहेत एकमेकांना नुकसान भरपाईच्या. यांचे परस्परांवर प्रेम होतं असं म्हणतां येईल कां ?

**वामन०**—मी तरी त्याला प्रेम म्हणण्याला तयार नाहीं. प्रेमांत, सहानुभूति, कळकळ, आदर, स्वार्थत्याग इत्यादि गुणांचा समावेश होतो.

**विमल०**—ज्यावर आपण प्रेम करतों तो मनुष्य आपणांवर कदाचित् अनुरक्त नसेल; म्हणून त्याच्यावर एकदम सूड घेण्याची प्रवृत्ति कशी होईल ? त्यानें तिरस्कार केला तरी ती दुसरी व्यक्ति त्याचा तिरस्कार करीलच असें नाहीं.

**वामन०**—म्हणजे दोन प्रेमी माणसांतच लग्नें होऊं शकतात असं आपण म्हणतां कां ?

**विमला०**—नाहीं. दोन प्रेमी निःस्वार्थी माणसं विवाहबद्ध होऊन एकत्र आलीं तर बरें, पण प्रेम असूनहि विवाहबद्ध न झालीं तरीही त्यांचें प्रेम असूं शकेल. प्रेमांत वैषयिक बाजू असावीच असें नाहीं. लग्नांत नेहमीं आपण तडजोड करीत असतो. विवाहानंतर असें प्रेम उत्पन्न होईल.

**वामन०**—विवाहापूर्वी आणखी कोणत्या गोष्टींचा विचार व्हावा असं तुम्हाला वाटतं ?

**विमला०**—प्रथमतः एकमेकांची आवड परस्परविरोधी नसावी. आयुष्यांतील सुखाच्या कल्पना दोन निरनिराळ्या टोंकांना जाणाऱ्या नसाव्या. संस्कृति एक असावी उभयता स्वावलंबी असावी. परस्परांत उत्पन्न होणारे प्रासंगिक जुजबी विरोध खरें आड येत नाहींत मात्र त्याकडे कानाडोळा करण्याची परस्परांची प्रवृत्ति व मनोरचना हवी. शिवाय आरोग्यदृष्टया योग्य संतति निर्माण करण्यास तीं लायक असावीत.

**वामन०**—बरं जाऊंया आतां. तुम्ही क्लबच्या परवांच्या बैठकीला येणार ना?

**विमला०**—जरूर, जरूर येणार!

**वामन०**—आणखी एक छोटासा प्रश्न आहे विचारूं कां? एकंदरींत स्त्रीवर्गाविषयीं आहे तो.

**विमला०**—हो, विचारा ना, काय हरकत आहे?

**वामन०**—लग्नानंतर नांवें बदलायचीं त्याबद्दल तुमचीं मतें काय आहेत? हल्लीं कुमारी मुली बापाचें नांव लावीत नाहींत व विवाहित स्त्रिया तर पतीचेंहि नांव लावीत नाहींत अगर बापाचेंहि नांव लावीत नाहींत.

**विमल०**—बरं मग, तुमचं काय म्हणणं आहे त्या बाबतींत?

**वामन०**—खरंच! तुमचं नाव सांगा पाहूं.

**विमल०**—म्हणजे हें काय आधुनिक 'पहाणं' चाललंय वाटतं?

**वामन०**—तसं म्हटलं तरी चालेल.

**विमला**०—माझें नांव कुमारी विमल वऱ्हाडपाण्डे.

**वामन**०—अहो, सबंध नांव सांगा; वडिलांचं नांव ?

**विमला**०—अस्सं ! विमल त्रिंबक वऱ्हाडपाण्डे.

**वामन**०—ठीक. पण आपण नेहमीं असें पितृत्वदर्शक नांव लिहाल कां ?

**विमल**०—[ विचार करून ] जरूर ? आमच्या बाबांच्यासारखे प्रेमळ वडील मिळून त्याबद्दलही आम्हांला लाज वाटावी अं ! खरोखर धिःकार असो आम्हां मुलींना ? मी आज क्षमा मागणार आहे याबद्दल बाबांची अगदी साष्टांग नमस्कार घालून क्षमा मागणार आहे. बरं पण लग्नानंतर मी कसं नांव लिहावं ?

**वामन**०—' विमल त्रिंबक ' एवढं कायम ठेवायचं व पुढं काय लावायचं तें मी काय सांगूं ?

**विमल**०—[ हंसून ] अहो खरेंच तो प्रश्न अजून सुटायचा आहे. पण ही नांवांची " तडजोड " खरंच पटली. वडिलांचें नांव कायम ठेऊन फक्त आडनांव बदलायचें होय ना ? जाऊं आतां ?

**वामन**०—या शिवाय परस्परांनीं आपलीं खासगी लाडकीं नावें ठेवावीं हवींतर, पण तीं फक्त खाशांच्या उपयोगाकरिता.

**विमल**०—खरेंच, आणखी एकच साधा प्रश्न ? धूम्रपानाबद्दल तुमचें मत काय आहे.

**वामन०**—[विचारांत पडतो ] हे पहा मी कांहीं तसा व्यसनी नाहीं. पण कॉलेजांत अगदींच कोरा राहिलों नाहीं. सध्यासुद्धां मित्र मंडळींत प्रत्यवाय नसतो.

**विमल०**—असें ?—[ विचारांत पडते. विरुद्ध बाजूंनीं जातात. ]

---

# अंक चवथा.

## प्रवेश दुसरा.

[ घारूअण्णा हात चोळीत प्रवेश करतो. ]

**घारु०**—या बाळ्यानं लेकानं मिनलि अलीकडे विशेष भारलेली दिसते. ती बोलत नाहीं कीं, मला जवळ येऊं देत नाहीं. मात्र द्राक्षें आणा, चिक्कू आणा असे हुकूम सोडते. ( इकडे तिकडे फिरून ) काय करावं ? या बाळ्याचा खरोखरच काटा काढूं का ?

**बळवंत०**—[ प्रवेश करून त्याच्याकडे संशयी मुद्रेनें पहात. ] हा लेकाचा माझा कांटा काढण्याच्या गप्पा करतो आहे. त्याला वाटतें कीं मिनीचें सध्यां माझ्याशींच सूत आहे. अन् ह्या मिनीला तर दिवस गेलेले दिसतात. एका बायकोच्या दोघां नवऱ्यांचें कठीण बुवा ! आधींच वाटणी, अन् त्यांत दुसऱ्या महिन्यापासून

फाक्या तो अगदी जवळ जवळ चवदा....महिनें! हो, अगदीं अस्संच ती म्हणाली. माझी तब्बेत नीट नाहीं? आता मिनीचें व आमचें कसं जमणार बुवा? त्या पेक्षां मी दोन बायका केल्या असल्या तर काय बहार झाली असती?

घारु०—[ वळून पाहून ] बरोबर! मी सुद्धा दोन बायका केल्या असत्या तर बरें झालें असतें. पण दोघींही एकदम बाळंत होण्याच्या मार्गाला लागल्या असत्या म्हणजे?

बळवंत०—अं:! असं न होण्याची काळजी घेतली म्हणजे झालं!

घारु०—बरं, पण बळवंतराव, आतां कसं करायचं?

बळवंत०—हें पहा माझे दहा हजार हिच्याकडे अडकून पडले म्हणून, तूंच आतां काढ येथून पळ! दुसऱ्या कोणा वकीलाकडे वा संपादकांकडे जा तुला नोकरी मिळेल. आणि ती तुझी सोलापुरची मास्तरीण आहे ना? लाव तिच्याशी पाट! आहे काय नि नाहीं काय? उगीच कां या भानगडीला चिकटून राहतोस.

घारु०—कांहो बाळोपंत हा पाट कीं पुनर्विवाह?

बळवंत०—हा पाट नव्हे तर काय? जा,कर जिवाचा थाट काढ पळ!

घारु०—बरं पण तुम्हींच दूर निघून गेलांत तर? मीच मिनीजवळ फार दिवस आहे.

**बळवंत०**—हें पहा मनुष्यांनी खरीखुरी सोय पहावी. तुझी सोय चटकन् होणार आहे; मी मात्र मध्येंच लोंबकळत राहीन. शिवाय मी मिनीच्या 'पोझीशन्चा' ना? दोन नवऱ्यांच्या प्रयोगाच्या वेडानं तिनं तुझ्यांशीं लग्नाची गंमत केली. तिला आतां त्याबद्दल पश्चाताप होत असला पाहिजे.

**घारु०**—बरं समजा, मी जातों म्हटलं, तर माझ्या दुसऱ्या लग्नाच्या खर्चाची सोय?

**बळवंत०**—बरं, मी बोलेन तें मिनीजवळ! तुला एक हजार रुपये दिले म्हणजे पुरेत ना? पुन्हा कधीं परत येणार नाहींस? अगदीं परजिल्ह्यांत जा.

**घारु०**—बरं करतों विचार. खरं सांगूं? तुम्हीं ही एका बोटाची गोष्ट काढलीत म्हणून; नाहींतर चालली होती तुमचाच कांटा काढण्याची गोष्ट. [ मीनाक्षी व शारदा येतात आड उभे राहून भाषण ऐकतात. ]

**बळवंत०**—हें पहा आत जाऊं सुद्धां नको! तुला एक हजाराचा चेक आतां देतों अन् तूं एकदम काळें कर कसें! अगदीं मिनीला भेटूं सुद्धां नको! मी येईन तुझ्या पुनर्विवाहाला! पण तसें कशाला? चला घराबाहेर पडूं. तुला अगदीं थेट सोलापूरचें तिकीट काढून देऊन गाडींत बसवतों.

**घारु०**—बर पण एकदां मिनीची भेट—

**बळवंत०**—चल पळ ! आतां भेटीची बात चीत करूं नको.

[ जातात व मीनाक्षी, शारदा प्रवेश करतात ! ]

**मीनाक्षी०**—ऐकलंस ना ? प्रत्यक्षच पाहिलंस ना ? माझा या विवाहाचा प्रयोगाचा खेळखंडोबा. एका स्त्रीला एक पुरुष व एका पुरुषाला एक स्त्री हेंच योग्य ? यांतच खरें स्वारस्य.

**शारदा०**—पण कांहीं पुरुष मात्र दोन दोन बायका वागवतात खरे ना ?

**मीनाक्षी०**—माझ्या प्रयोगापेक्षा तें थोडें सोपें आहे इतकेंच. बायकांच्या या मासिक अडचणी अन् वार्षिक अडचणी विसरून चालणार नाहीं. पुरुषांची काय सकाळची अडचण संध्याकाळीं नाहींशी होत्ये.

**शारदा०**—एकंदरींत घारूला पळविण्यांत बळवंतरावांना तुझीच फूस दिसते !

**मीनाक्षी०**—अग तसं मी त्यांना काहीं सांगितलं नव्हतं. पण मला त्यांचा बेत पसंत पडला इतकंच ! बरं, तुझं कसं काय ?

**शारदा०**—स्त्री श्रेष्ठ कां पुरुष श्रेष्ठ हा प्रश्नच मुळीं आमच्यांत उपस्थित होत नाहीच. परस्परांचें सुख आम्हीं परस्पर पहातों. घर मी पहातें, तें दार संभाळतात ! एकदां सुद्धां हक्काचा प्रश्न उद्भवला नाहीं.

**मीनाक्षी०**—तें ठीक; पण इतरांचें कसें ?

**शारदा०**—अग, हा आर्थिक प्रश्न आहे. ज्याचा पैसा त्याचा वैस! माहेरून इष्टेट बरोबर आणणाऱ्या मुलींना घरांत वरचढपणा प्राप्त होतोच हें आपण पाहातों. नवरा खोऱ्यांनीं पैसा आणणारा न्यायाधीश असला कीं त्याच्या बुटाचे बंद सोडायला बायका तयार असतात, व तें अगदीं साहजिक आहे. नाहींतर त्याला लाथेनींही पाणी दाखवितात. आतां माहेरून पंचवीस पंचवीस हजाराच्या थैल्या आणणाऱ्या स्त्रियांची दैना आपण ऐकतों ती एक खरी तरी नसेल, अन् खरी असल्यास त्या बायांचें दुर्दैव! बाकी स्त्रियांना समानता नाहीं वगैरे सगळं फोल आहे. त्या चांगल्या वरचढ आहेत. त्या स्वावलंबी झाल्या म्हणजे खरा आर्थिक प्रश्न सुटेल. त्यांनीं नोकऱ्या केल्याच पाहिजेत असें नाहीं; फक्त अडीअडचणीला तोंड देण्याला त्या समर्थ असाव्या एवढेंच.

**मीनाक्षी०**—अग नवराबायकोंत तंट्याचें कारण असतें त्यांरेच अन् जगाला दिसतें निराळेंच. तसाच हा समान हक्काचा प्रश्न! खर इंगित आहे इथें पैसा!

**शारदा०**—कबूल! स्त्रियांना स्वावलंबी झालें पाहिजे म्हणजेच प्रथम, पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण संपादन केलें

पाहिजे ! ती त्याची सहकारी झाली पाहिजे. ...स्त्रीपुरुष परस्परांस विलासीपणांत सुद्धां संतोष देऊं शकली पाहिजेत. मग भांडण नाहीं नि तंटा नाहीं. असेंच कीं नाहीं ?

[ जातात. ]

---

# अंक चवथा

——×※×——

## प्रवेश तिसरा.

[ विमल, यमुताई बोलत बसल्या आहेत. ]

**विमल०**—मावशी, मधूकाकांचें तुजवर किती प्रेम आहे खरो-खरच तूं मोठी भाग्यवान् !

**यमु०**—खरंच विमल, पण मींच अभागी ! मला त्या देव-पुरुषांना सुख देतां येत नाहीं. आतां कसं वागावं तें तरी मला शिकव !

**विमल०**—खरंच, मावशी, तूं मागें घेशील ? होऊन जाऊंदे अगदीं लग्नापासून धडा पुन्हां घे. काढ पाटी गिरव श्री ग णे

**यमु०**—विमल, दाम्पत्य-रहस्याचा श्री ग णे वळवते बरे तुझ्याकडून.

**विमल**——मावशी तुला पाठराखण कोण आलं होतं ग ? तुझं गर्भाधान थाटांत झालं का ?

**यमु०**—कां आतां, गर्भाधान आणि पाठराखणं सुचूं लागलं वाटतं. सध्यां डॉक्टर वामनरावांचें तुझें संघट्टण फार फार वाढलं आहे असं ऐकतें. याच चर्चा करतां वाटते दोघेजण ?

**विमल०**—तुझें म्हणणें थोडं खरं आहे, पण अजून परस्परांचें कांहीं बाबतींत खुलासे व्हायचे आहेत. एकंदर सगळं नीट जमलं. त्याच्या आईचें व माझें बोलणें होऊन त्याबाजूनें कांहीं चौकशी करावयाची राहिली नाही असं झालं म्हणजे तुम्हा वडिलमंडळींच्या आशिर्वादानं ठरवूं सगळं. पण त्यापूर्वी माझी प्रतिज्ञा आहे कीं तूं पूर्णपणें सुखी झाल्याशिवाय मला मुळीं लग्नच कर्तव्य नाहीं. तुझें व मधूकाकांचें पूर्ण सख्य करीन अशी प्रतिज्ञा करून मी इकडे आलें आहे. आतां ही प्रतिज्ञा पुरी होण्यास तुझीच खरी मदत हवी. तुमच्या उभयतांच्या हृदयाच्या आंतल्या गाभ्यांत परस्पराविषयी गाढ प्रेम वसत आहे पण ते तुम्हास बाहेर परस्परांस नेहमींच्या व्यवहारांत दाखविता येत नाहीं. तें साधलें म्हणजे झाले.

**यमु०**—अग, आतां आमचं आयुष्य गेलं. आतां तुम्हा मुलींचं सुख व आनंद पहावयाचा.

विमल०—खरंच, मावशी, तूं आजी कां झालीस तुझं वय किती तर ३० आणि काकांचं ३६. हें काय म्हातारपणाचं वय ? तिकडे इंग्लंडात तर याच वयांत लग्नं होतात! परवांच इथे सुद्धां ऐकलंकीं एक पन्नास वर्षांचे डॉक्टर व तीस वर्षांची नर्स यांचा विवाह झाला.

यमू०—खरेंच विमल, आणखी हे बघ पुरुषांना या सिगारेटचें काय एवढें सुख वाटतें. मला तर नुसता वास सहन होत नाहीं एवढें सुद्धां पुरुषांनी आपणाकरितां करूं नये ना ?

विमल०—मावशी अग आहे काय त्यांत. पुरुष जर दुसऱ्याला त्रास होणार नाहीं इतक्या स्वच्छतेनें वागतील तर कांहींच तक्रारींचें कारण नाहीं; आई म्हणते कीं इतकें सोवळेपण कसें चालणार. तिकडे विलायतेंत बायका धूम्रपान करतात. आम्हीं बायकांना धूम्रपानाची संवय व्हावी म्हणून एक क्लब काढणार आहो. हवीतर तूं हो आमच्या क्लबाची सभासद.

यमू०—विमल तूं माझी थट्टा करतेस हे चांगले नव्हे.

विमल०—मी तुझी थट्टा नाहीं करीत. धूम्रपानाचें व्यसन कमी व्हावें म्हणून मी खरेंच चळवळ करणार आहे पण हा कांहीं मद्यपानबंदीसारखा प्रश्न नाहीं. नाहीं का ?

यमू०—बरं, तूं माझी गुरु हो ! या सर्वच बाबतींत तूं सांग-

शील तसं आजपासून वागायचं ठरवितें. मी स्वतंत्रपणें विचार करणेंच सोडून देतें. पण लग्नाच्या आधींच तुला इतकं प्रेमाविषयक ज्ञान कसं झालं ?

**विमल०**—अग त्यांत काय आहे? सध्या वर्तमानपत्रांत मासिकांत याच चर्चा चालतात.

**यमु०**—आणि तुम्ही मुली तें वाचतां ?

**विमल०**—नको वाचायला! कॉलेजांतले विद्यार्थी काय करतात?

**यमु०**—बरं बाई तूं सांगशील तसेंच आतां वागायचें.

**विमल०**—ठीक आहे. माझें ऐकायचे. ठरलें ना? ही आनंदाची गोष्ट हा तुझा आनंदाचा निश्चय आधीं आईला जाऊन सांगून येते. [ उठते. ]

**मथुरा०**—[ एकदम प्रवेश करून ] काय ग विमा, काय बाई एवढी आनंदाची गोष्ट आहे सांग तर पाहूं !

**विमल०**—माझी प्रतिज्ञा सिद्धीस जाणार! मधुकाका व मावशी तुमच्या रविवार क्लबच्या सभासद होणार! मधुकाकांना अत्यंत प्रिय असलेलं आणि गेल्या दहा वर्षांत जन्मास न आलेलं असं कन्यारत्न लाभण्याचा संभव आला आहे ही गोष्ट जाहीर करण्यास मला आनंद होत आहे. आजपासून मी सांगेन तसें मावशी मधुकाकांबरोबर वागणार आहे!

**मथु०**—होय कां ग यमू? बरं बाई. विमलवरील उभयतांच्या वात्सल्यामुळं तरी यापुढं तुम्हा दोघांत आनंद नांदू

दे ! विमा, यां बघ मी मोगरीच्या तीन वेण्या आणल्या आहेत. त्यांतील एक तूं घाल, मावशीं-च्या डोक्यांतही एक घाल व एक माझ्या डोक्यांत पण घाल. [ विमल तसें करतें. ]

यमु०—हें पहा, स्वतः वेणी आणल्याशिवाय मी आजपर्यंत कधीं घातली नाहीं. पण आजपासून नव्या आयुष्याला आरंभ करायचा आणि पहिलाच प्रसंग नकाराचा येऊं नये म्हणून ऐकतें बरें.

विमल०—बरं मावशी, मी चहा करतें, तूं चटकन काकांना चहा घेऊन जा. तोंपर्यंत. आई अन् मी बाहेर जाऊन येतो.

[ तिघी आत जातात. ]



# अंक चवथा

## प्रवेश चवथा.

[ माधवराव आपल्या स्वतंत्र खोलींत बसले आहेत. खोलीमध्यें फोटो वगैरे खूपच टांगले आहेत. त्यांच्या आसपास हिशेबाच्या वह्या पडल्या आहेत. हाटेलांतून ते चहा मागविण्याच्या बेतांत आहेत. इतक्यांत डोक्यांत वेणी घातलेली यमुताई प्रवेश करते. ]

**माधव०**—[ घड्याळाकडे पाहून ] किती चार वाजले ! चहा आणायला सांगितला पाहिजे. कंटाळ्याच्या या वेळेला अर्धातास तरी घरचें वातवरण नि घरचा चहा पाहिजे ! पण आम्हीं पडलों हिंदू ! तात्या. शुद्ध भटजी ! आमची बायको इकडे ढुंकून पाहील तर ना ! हीच जर जरा होशी असती तर काय मजा आला असता, अशी मजा केली असती—अरे रामा.

[ समोरून दाराने चहा घेऊन येत असलेल्या यमूताईकडे पहात आश्चर्यचकीत होऊन स्तब्ध रहातो. ]

**यमु०**—[ टेबलावर चहा ठेऊन ] इश्श ? पहात काय रहायचं ? मी आज कोणी नवी आलें आहे कीं काय ?

**माधव०**—आज आपण नव्या आहां कीं नाहीं हें कोणीहि सांगेल. रामाला हांक मारूं कां ? तोच

सांगेल. मी आतां त्याला चहा आण म्हणून सांगायला उठलों होतों तोंच आपण आलांत. ही डोक्यांत वेणी. आं हा काय थाट आज !

यमु०—आधीं हा चहा घ्यावा; निवेल ना—कपबशी कांहीं नको. तसाच घेण्यासारखा आहे.

माधव०—[ दोन कपबशा काढून ] वा, आज मी एकटाच कसा चहा घेणार ?

यमु०—मी आणला आहे दोन कप चहा. मला वाटलंच मला पाहतांच असं अंगांत संचरणार म्हणून.

माधव०—आज आपण अशा थाटांत आल्यावर आणि तेंहि असं अचानक मग कोणाच्या अंगांत नाहीं संचारणार ?

यमु०—इश्श ! भारीच बाई पुरुष बायकांना चढवतात केव्हां केव्हां ! त्यांना थोडं कां उत्तेजन बायकाकडून मिळालं कीं कळस झालाच !

[ दोघेहि चहा पितात. ]

यमु० – बरं, आतां घरीं केव्हां येणार ? विमल आज आपल्या घरीं परत जाणार आहे ! त्यांच्याकडे उद्यां नवीन आधुनिक मिश्रस्वरूपाचें व थाटाचें एक हळदीकुंकु होणार आहे. बरं मी जाऊं ? घरीं लवकर यावं हं. [ जाते. ]

माधव०—आज कांहीं न्यारा प्रकार आहे! त्या विमल पोरीनें इतका चमत्कार घडवून आणला हं! या जुन्या वातावरणांत वाढलेल्या बायका, जिवाला जीव देतील. पण यांची लाज ती खुळी भीड मर्यादा सुटायची नाहीं—आणि ती देखील आपल्या नवऱ्याजवळ! एवढाच यांचा दोष. इकडं आम्ही बाहेर संमाज-स्वास्थ्य, आधुनिक कामशास्त्रें वाचतो तर या घरीं आजीबाई वळण गिरवीत फुलवाती करीत असतात. बरं नवीन विचार, नवीन चर्चा करतील तर तेवढं शिक्षणहि नाहीं. प्रहर उलटल्यावर सर्वजण डाराडूर झोपल्यावर बांगड्यांना फडके बांधून पतीसेवेला जाण्याचे दिवस आतां गेले हे यांना समजेल तो सुदीन.

[ चला जावें जरा बाहेर. ]

# अंक पांचवा

## प्रवेश पहिला

[ विमल व वामन—बागेत बोलत आहेत. ]

**विमल०**—आपल्या क्लबचा लोकांना फार उपयोग होणार बरें का! खरेंच आम्ही आणखी एक क्लब काढणार आहो ऐकलंत का?

**वामन०**—कसला बुवा क्लब?

**विमल०**—स्त्री-धूम्रपान-क्लब!

**वामन०**—अं: स्त्री धूम्रपान—

**विमल०**—परवां ती सखू पहिल्यादांच सासरी गेली आणि म्हणे नवऱ्यानें सिगारेटचा धूर सोडला तिच्या तोंडावर आणि ती ओकली नी काय नी काय? बरेंच ते प्रकरण माजलें.

**वामन०**—मग?

**विमल०**—तुम्ही पुरुष सिगारेट ओढणार. तुमच्या संगतींत आम्ही राहणार आम्हीही संवय करून ठेवावी धुराची असा विचार आहे. अजून नक्की नाहीं झालें.

**वामन०**—आहे खरा आम्हांला पेंच.

**विमल०**—जाऊं द्या ! हा प्रश्न तितका महत्वाचा नाहीं. पण आपली जाणिव असावी तें बरें ?

**वामन०**—बरें पण आपल्या वधूवर क्लबाचें अध्यक्षस्थान तुमच्या वडिलांनी कां स्वीकारलें नाहीं ?

**विमल०**—बाबांना काम करणें आवडतें. पुढें पुढें करणें त्यांना बिलकूल खपत नाहीं असें नाहीं तुमच्या प्रत्ययाला आलें ?

**वामन०**—खरंच ! या चळवळीचे श्रेय तुमच्या वडिलांना आहे.

**विमल०**—आमचे बाबा देव मनुष्य आहेत. याबद्दल दुमत नाहीं. कोणी म्हणतात. वडिलांपेक्षां आई श्रेष्ठ. पण मला दोघेंही सारखींच वाटतात. लग्ना-नंतर आपण माझ्या आईबापांना दुखविणार नाही ना ?

**वामन०**—छे: छे: ! पण अद्याप आपलं लग्नच नक्की झालं नाहीं हें विसरूं नका ! [ हंसतो ] माझ्याकडून 'ना' नाहीं पण योग्य ती मुदत संपल्यानंतरच आपण एकमेकांस शब्द देणार आहों ना !

**विमल०**—हो, मी तें विसरलेंच होते. पाहिलं, अस्सा विसर पडतो ! कधींकधी न्यायाधीश देखील कोर्टांत आपला निकाल असाच अगाऊ बोलून जात असेल, नाहीं ?

**वामन०**—अन्, तुम्हीं आमच्या आईसाहेबांची गांठ घेणार आहांत ना? चला तर आतांच.

[ पडदा वर जातो.—दिवे लागणीची वेळ. —वामनरावांच्या आईसाहेब देवासमोर बसल्या आहेत. समोर फक्त दत्ताची मूर्ती आहे. आरती चालू आहे. । तीन शीरें सहा हात । पायी खडावा गर्जत !

[ आरती संपते. ]

**आई०**—कोण वामन, या कोणरे?

**वामन०**—आई, ते त्रिंबकराव वऱ्हाडपांडे? —मी नाहीं कां बोललो? —त्यांची कन्या.

**आई०**—कोण? —विमलाबाई होय? बसा तुम्ही दोघेही.

[ त्याच्या हातावर नैवेद्याचा अर्धा अर्धा पेढा टाकते. ]

**वामन०**—आई, आज अर्धाच कां?

**आई०**—अरे, आतांपर्यंत मला एकच मुलगा होता, त्याला मी देत होते सबंध पेढा! पण आतां घरांत दोन मुलं होणार, मग नको वांटणी करून द्यायची संवय लावून घ्यायला?

**वामन०**—म्हणजे काय? मी यांना आपलें सहज भेटायला आणलें आहे. बी. ए. मुलगी किती साधी असते याचं उदाहरण ह्मणून याना इकडं मुद्दाम आणलें, तुझ्याकडे!

**आई०**—मग बाळ, मीतरी तेंच म्हणते आहे. नवरी मुलगी दाखविण्याची ही नवी पद्धत बरं बाळ, मला कां समजत नाहीं; बरें तेवढा दत्ताला दुसरा मोठा हार

घेऊन येतोस कां फूलवाल्याकडून? तोंपर्यंत हीच्या-जवळ बोलत बसते. घरचा साधा विणलेला हार आहे पण आज सुंदर भरगच्च दुसरा हार घेऊन ये बरे कां?

**वामन०**—[ स्वगत ] म्हणजे चागलं? मला आईनं बाहेर घालविले! लग्नानंतर आईचें माझेवरचं वात्सल्य विभागले जाणार कीं काय? पण असा योग यावा हींच तर इच्छा. चला, बाहेर जावून फुलांचा पुडा आणावा. आणि विमलला एक सुंदर वेणी पण आणावी. आईनं वेणी दिली तर ती शोभूनहि जाईल. [ जातो ]

**आई०**—विमलाबाई, तुमच्या येण्याचा हेतु, तुम्हीं तोंडानें सांगण्यापेक्षां, तुमच्या उभयतांच्या तोंडावरूनच समजला.

**विमल०**—[ आनंदाने भरून येऊन ] मग आपली लेक म्हणून आपण मला पत्करणार ना?

**आई०**—अग, मी कोण पत्करणार? त्यानंच सर्व हकीकत मला सांगितली आहे. माझा बाळ दैववान् म्हणून तुझी त्याची ओळख झाली; पहा आमच्या जुन्या रीती-पेक्षां ही वधूपरीक्षेची किती उत्तम रीत बरं? तुम्हीं उभयतां परस्परांना पसंत करीत आहाच. अशा स्थितींत मी कोण मध्यें पडणारी? अगर मी नको तरी

म्हणणार कशी? शिवाय पेढा द्यायचा तो एकच दोघांना देऊन मी नाहीं का माझा निर्णय दिला? माझ्या वाटींत आणखी देखील पेढे होते.

**विमल०**—बरं आहे, आपल्याला "आई" म्हणण्याचा अधिकार मला आजपासून आला ना? मी आपल्याला नमस्कार करतें. [ नमस्कार करते. ]

**आई०**—हें बघ, तूं मुळीच शंका धरूं नको. तूं घरांत ये, कीं हा संसार तुझ्यावर सोंपवलाच. मी कधींसुद्धां तुमच्यांत ढवळाढवळ करणार नाहीं. तुम्ही दोघं आनंदांत असलांत म्हणजे आमचं डोळ्यानं पारणं फिटले! गेली दहा वर्षे मी याच आशेवर काढली आहेत. [ वामन येतो. ]

**वामन०**—आई, हीं घे फुलं. हा हार, अन् हा पुडा.

**आई०**—अन् हा तिसरा पुडा कसला रे? [ उघडून ] अस्सं काय? मुली मी आपल्या हातानं आज तुझ्या डोक्यांत वेणी घालतें हं. [ तसे करते ]

**वामन०**—झालं कां तुमचं बोलणं? खरेंच आई मी मधून मधून सिगारेट ओढीत असे पण आजपासून ती सोडण्याचें ठरविलें आहे. तुला होतें कांग ठाऊक मी सिगारेट ओढीत असे हें?

**आई०**—[ त्याच्या बोलण्याकडे लक्षं न देऊन. ] आजपासून मी तुला हिच्या स्वाधीन केलें आहे. आतां तीच तुझी

काळजी घेईल; चला, मी आतां निःशंक झाले. माझ्या तोंडून स्पष्टच बोलवून घ्यायचें होते कां रे?

**वामन०**—आई हें बघ तुमचें मुग्धांत राहिलें असतें तर आम्हांला मोकळेपणा वाटला नसतां का? तूं हो म्हणालीस आतां झाल्यासारखेंच नाहीं का?

**विमल०**—बरें मी येऊं आतां?

[ वामनकडे अभिमानाने पाहते. ]

**आई०**—ये बरें बाळ, हें पहा तुम्हीं आतां दोघेही झटपट लग्न उरकून घ्या. समारंभ बिलकुल नको. एक महिना महाबळेश्वरला राहून या, मग लोकांना मेजवानी देऊं.

[ दोघे नुसत्या डोळ्यांनी परस्पराचा निरोप घेत घेत जातात. ]

# अंक पांचवा

—×✻×—

## प्रवेश दुसरा

[ गुडीचे हॉटेल. शशिकला व बॅ. रामचंद्र. ]

**शशि०**—हें पहा, मी लग्न करीन तुमच्याशीं पण तुमच्या घरीं मी नाहीं रहायला यायची. दोघांची बिऱ्हाडें अगदीं स्वतंत्र! परस्परांनीं एकमेकांच्या घरीं जाऊन परस्परांना भेटावं.

बॅ. रामचं०—[ गोंधळून ] म्हणजे काय ?

शशि०—हें पहा मी आहे स्वभावानं चमत्कारीक, लाडांत वाढलेली लहानपणापासूनच; माझा खर्च चालविण्या-इतकी बाबांनीं तरतूद करून ठेवली आहे, शिवाय माझ्या खासगी इष्टेटीवर तुम्हीं लग्नानंतर हक्क सांगणार नाहीं असें लिहून दिलें पाहिजे. जोंपर्यंत आपण एकमेकांस आवडूं तोंपर्यंत मैत्री ? कंटाळा आला कीं दूर ! कंटाळा संपला कीं पुनः एकत्र ! मी अशी कां वागतें असं तुम्हीं मला विचारूं नये, मी पण तुम्हांला विचारणार नाहीं. देवधर्म मी मानीत नाहीं, पण नीतीचे नियम पाळणें हें व्यक्तीला सुख, शांतता, समाधान व आरोग्य पाहिजे असेल तर आवश्यक आहे. परस्परांवर विश्वास ठेवला पाहिजे, विश्वास नाहींसा झाला कीं संबंध संपला. कोणाची कोणाला बेडी नको !

बॅ. रामचं०—लोकं हसतील !

शशि०—हसूं द्यात. तुम्हांला ही योजना पटल्याशीं कारण, यांत लोकांचा संबंध येत नाहीं ?

बॅ. रामचं०—पण हें जरा विचित्रच नाहीं कां ?

शशि०—अंः त्यांत काय आहे विचित्र ? बायको संस्थानांत तर नवरा तीनशें मैलांवर ब्रिटिश हद्दींत ! नवरा गुजराथेंत तर बायको पांचशें मैलांवर दक्षिणेंत,

असे सगळे व्यवहार सरळ अन् सुव्यस्थित चालतात! मुलंबाळं होतात नियमितपणें! अन् माझी तर काय तुमच्या शहरांतल्या शहरांत रहाण्याची योजना. मला माझी नोकरीही करतां येईल; माझी नोकरी मला सोडावी लागली तर मी तुमच्याजवळ नोकरीची भरपाई म्हणून वीस हजार रुपये मागेन. देतां वीस हजार?

बॅ. रामचं०—बरं, तें असो. मुलांची काय व्यवस्था?

शशि०—माझीं मुलं मी संभाळीन.

बॅ. रामचं०—बरं नांव?

शशि०—तुमचं आडनांव माझ्या नांवापुढें लावीन.

बॅ. रामचं०—असो या अटी मी ऐकल्या आहेत. पसंत पडल्या कीं लग्न करूं.

शशि०—हें पहा, पसंत—नापसंत ताबडतोब सांगा. विचार करून सांगण्याजोगं यांत काय आहे? लग्न हा नैतिक करार आहे. त्याला कोणी धार्मिक म्हटलं तरी माझी हरकत नाहीं. मात्र प्रेमबीम या पोंचट कवींच्या पांचट व फोल कल्पना आहेत. प्रेम—खरं निःस्वार्थी प्रेम, सहवासानंतरच उत्पन्न होतें- विलायतेहून आय्. सी. एस्. येतो व पन्नास पंचवीस हजार रुपये घेऊन लग्न करतो; यांत तुम्हांला

प्रेमाचा वास तरी येतो कां ? आधीं सहवास घडेल तरच प्रेम उत्पन्न होईल.

**डॉ. रामचं०**—बरं, ठरलं; चला, लग्नाची रजिष्ट्रारला नोटीस देऊं.

**शशि०**—बरं आधीं चहा घेऊं या.

[ चहा घेऊन हातात हात घालून बाहेर पडतात. ]

---

# अंक पांचवा.

## प्रवेश तिसरा.

[ माधवराव एकटेच बसले आहेत. सईताई प्रवेश करतात. ]

**माधव०**—कोण सईताई, ती बाहेर गेली आहे; कांहीं काम होतं ?

**सई०**—काम तुमच्याशीं पण आहे.

[ यमूताई न कळत येऊन दाराच्या आडोशाला ऐकत राहतात ]

**सई०**—हें पहा तुम्हीं हल्लीं यमूआक्काशीं नीट वागत नाहीं अशी तिची तक्रार आहे; अन् त्याला कारण मी असं ती म्हणते, हा मजवरचा आळ नाहींसा करा.

**माधव०**—तिच्याजवळ मी नीट वागत नाहीं हें साफ खोटं. हें बिघडलेली घडी-प्रकरण आहे. उलगडलेली घडी पुन्हां नीट बसत नाहीं ती अशी. जिला माझी

योग्यता बी. ए. पेक्षांही अधीक वाटते, मला कोणीही वाईट म्हटलेलें जिला आवडत नाहीं, जी मज-बरोबर दारिद्र्यांतहि आनंदानें दिवस काढते, तिला मी वाईट तऱ्हेनें वागवितों हें म्हणणें वस्तुस्थितीला धरून नाहीं. आता तिला संशयपिशाच्चानें पछाडलें आहे त्यामुळें तिला माझ्या कृतींत विपरीतपणा दिसतो त्याला मी काय करूं? तिला दुःख होऊं नये हीच माझी खरी इच्छा.

सई०—मग तिची इच्छा तरी काय? तुम्हीं तिला मज-विषयींचा निर्वाळा तरी कां देत नाहीं? तुम्हीं दर्जानें शिक्षणानें मजपेक्षा हलके आहां हें माझ्या तोंडून निघालेले कटु शद्ब तुम्हांला अक्काकडून कळलें ना? मी असें म्हटल्याबद्दल तुम्हीं मला शिव्या दिल्या असतील नाहीं?

माधव०—काय शिव्या देण्याचं कारण? माझी खरी किंमत स्पष्टपणें कोणी बोललें तर मला त्याचं वाईट कां वाटावें. खरें बोलण्याची लोकांना आडकांठी कां असावी?

सई०—असें कडुजहर ओकणाऱ्या बाईबद्दल तुम्हांला तिर-स्कार वाटला पाहिजे, व तसा तो तुम्हांला वाटतो हें तुम्हीं अक्कांना स्पष्टपणें कां नाहीं सांगत?

माधव०—काय सांगू म्हणतां तिला?

सई०—तुम्हीं माझा अगदीं द्वेष करतां म्हणून सांगा.

माधव०—पण ती माझ्यावर या बाबतींत विश्वास ठेवीत नाहीं.

सई०—बरें पण मी तुमच्याविषयीं असें बोलेन असं वाटतं कां?

माधव०—जी गोष्ट सत्य आहे ती उघड बोलायला काय हरकत आहे. आतां तुम्हीं असे उद्गार काढले की नाहीं त्याची पंचाईत करण्याचं मला काय कारण?

सई०—आहो, पण मी तसे उद्गार काढले ना?

माधव०—बरें, तुम्ही स्वतः जी गोष्ट केली म्हणून निर्वाळा देतां त्याबद्दल मी शंका धरीत नाहीं.

सई०—मग सांगा, तुम्हांला माझा मनापासून राग आला कीं नाहीं?

माधव०—हे प्रश्न असेंच चालूं ठेवावें असें मला वाटत नाहीं. तुम्ही माझा तिरस्कार करतां ही गोष्ट पुरेशी आहे. याच्या उलट मी माझा तिरस्कार करणाऱ्याचा द्वेषच करावा असा लोकांनीं तरी हट्ट कां धरावा? माझ्या विषयीची सत्य गोष्ट जाहीर करणाराचे मी तरी कौतुकच करीन. अन् अशा सत्यवक्तच्या तुम्ही म्हणून मी तुमच्याबद्दल मनांत आदर बाळगला तर तुम्ही मला विचारणार कोण? एकाद्या माणसा-विषयीं मला सहानुभूति वाटत असली आणि त्या माणसानें माझी निंदा केली म्हणून अंतःकरणांत उत्पन्न झालेली सहानुभूति हृदयांतून नष्ट कशी

होईल ? माझ्या मनांत तुमच्याविषयीं सहानुभूति, आदर, कळकळ, कींव इतके विकार उत्पन्न झाले व ते मी मनांत दडपून ठेवले तर तुम्ही मला विचारणार कोण ? तुमच्या आड ते कधीं आले आहेत? तुम्ही माझ्या निंदक आहां ही फार चांगली गोष्ट आहे. मीही तुमची निंदाच केली पाहिजे असा तुमचा हट्ट कां ?

सई०---तसें करण्यानें अक्काला समाधान होईल ना ?

माधव०---तिच्याविषयीं प्रेम, कळकळ, आदर, सहानुभूति माझ्या ठिकाणीं पूर्णपणें वास करीत आहे. तिला त्रास होऊं नये म्हणून तिनें जर कांहीं अटी घातल्या तर माझें शरीर त्या अक्षरशः पाळील.

सई०---म्हणजे जो प्रश्न तुम्हीं एकदां विचारलात तो आतां साफ मनांतून काढून टाकलांत ना ?

माधव०---केव्हांच ! माझी बाजू मी पूर्वींच तुमचें पुढें मांडली आहे.

सई०---एकूण असें आहे तर ? तुम्हीं मला खरीखुरी बहीण मानता तर ?

माधव०---तुमचा भाऊ याच नात्यानें मी बोलत आहे. इतर कोणताच स्वार्थी विकार माझ्या मनांत नाहीं हें निश्चित समजा. बहीण याच नात्यानें तुमच्या-बद्दल जीव कळवळतो व गाजरपारख्या पदवीधरांचा संताप येतो. तुमच्याकरितां चांगलें पदवीधर स्थळ

दिसलें तर मी तुमची गोष्ट काढतों पण तुम्हांला चांगलें रूप नाहीं असें सांगतांच जो तो थंडावतो.

[ यमूताई हा संवाद ऐकत आहेत अशी सईताईना शंका येऊन त्या त्यांना हांक सहज मारतात व यमूताई प्रवेश करतात. ]

**सई०**—(हंसून) आक्का, कां ऐकलेंत ना आमचें नातें !

**द्वारका०**—हो, ऐकलें.

**सई०**—बरं तर आतां मी तुमची दोघांची पूर्ववत् बहीण झालें. मजकडे बहिणीशिवाय इतर दृष्टीनें ते पहात नाहींत हें मी तुला निश्चीत सांगतें व त्यांचें स्वतःचे उद्गार तर तूं ऐकले आहेसच. मनांत उत्पन्न झालेली आदर व सहानुभूति हीं नाहींशी व्हावी असा मी प्रयत्न केला पण त्यांत यश आलें नाहीं खरें, पण सत्य व स्पष्ट बोलणारावर कोणीहि जरूर विश्वास ठेवावा. नाहींतर मी सईताईचा तिरस्कार करतों असें वरवर म्हणावयास त्याना काय हरकत होती ? त्यांना बहीण नाहीं. सुशिक्षित बहिणीची संगत सोबत तिच्याशीं विचारविनिमय या बाह्य गोष्टींचीच त्यास जरुरी आहे आणि या गोष्टींना तूं हरकत घेऊं नयेस.

**यमु०**—खरोखर, निर्विकार बुद्धीनें हृदयांत सहानुभूति व आदर बाळगणारीं तुमचीं हृदयं खरोखरीं पापभीरु व स्वार्थत्यागी आहेत हें माझ्यां आतां पूर्णपणें

प्रत्ययास आलें आहे. तुम्ही दोघंहि इतक्या उच्च कोटीचीं माणसं आहांत याची मला कल्पना नव्हती. माझ्या फाजील संशयखोर स्वभावाबद्दल मला क्षमा करा.

**सई०**—खरेंच भाऊराव, तुम्हाला एक गोष्ट सांगावयाची राहिलीच, उमरावतीचे सरदार भाऊराव यांनीं मला मागणी घातली आहे.

**माधव०**—खरें कीं काय पण ते तर आहेत देशस्थ.

**सई०**—मी त्यांना बहुतेक रुकार दिला आहे. इकडे येण्यांत ही गोष्ट कानावर घालण्याचाही हेतु होता. आतां तीन ब्राह्मण पोट जातींत ऐक्य करण्याचे ठरलें आहे ना ?

**माधव०**—पोटजातींत ऐक्य जरूर करा पण तुमच्या घरच्या मंडळींना पटलें का ?

**सई०**—आतां नातेवाईकांची परवा करावयाची नाहीं असें मी ठरवलें आहे. माझें हित मलाच पाहिलें पाहिजे.

**माधव०**—अगदीं बरोबर. त्यांची बायको नुकतीच वारल्याचे ऐकले होतें खरें. चांगला माणूस आहे. लग्न केव्हां आटोपणार.

**सई०**—आठ दहा दिवसांत आटपू. बरें जाते.

---

# अंक पाचवा

## प्रवेश चवथा.

[ यमुताई व मीनाक्षी बोलत बोलत प्रवेश करतात. ]

मीनाक्षी—बाई तुम्ही यमूताई नाहीं का ? माधवराव बर्वे तुमचें यजमान नाहीं का ? आठ महिन्यापूर्वी तुमचे माधवराव गाण्याला आले होते. पण त्यांचा पायगूण असा चांगला कीं त्या दिवसापासून मी माझा गाण्याचा पेशा सोडला.

यमु०—खरें ऐकलें बाई, तुम्हींच होता म्हणून ते मला पुन्हां जसेच्या तसें पवित्र लाभले. तुम्हीं तुमच्या अनुभवाच्या गोष्टी सांगतां कां कांहीं !

मीनाक्षी—पुरूष पहा, नवाईचे भोक्ते असतात! अशी नवी नवलाई तुम्हा घरंदाज बायकांनासुद्धां मनांत आणलेंत तर बरोबर उत्पन्न करतां येईल. रात्रीं पुरूष बाहेर जातो म्हणाला कीं पत्नीनें आपला कान पिळावा आणि म्हणावें हें कां बरें बाहेर जातो म्हणतात. आपलेच कांहीं तरी चुकले आहे. मुलांना भरपूर खायला घाला कीं त्यांना बाहेर खाण्याची चटक लागायची नाहीं. स्वतःच्या पतीजवळ अव्वळपघळ वागायला लाजूं नका. घरीं सुख नसलेल्या वेवाहित

तुम्हांच्याकडूनच मला यांच वर्षांत पन्नास हजार रुपये मिळाले. हे ध्यानांत आणा. बरें डॉ. वामनरावांकडे चहाला येणार ना?

यमु०—हो येणार तर! पण घरीं जाऊन आम्ही दोघें बरोबरच येऊं. [ जाते. ]

मीनाक्षी०—ही बाई बरीच माणसाळलेली दिसते. चला आपणही जावे.

[ पडदा पडतो. ]

[ व दुसरा सीन उघडतो. ]

[ सर्वांचीं लग्ने झालीं असून सर्व जोडपीं मधुचंद्र आटोपून परत आलीं आहेत. डॉ. वामनरावाकडे आज लग्नाची मेजवानी आहे.

दिवाणखान्याच्या दारांशीं सौ. विमलाताई व डॉ. वामनराव स्वागतार्थ उभी आहेत. प्रथम सईताई व सरदार भाऊसाहेब जोडीनें येतात. नंतर बॅ. रामचंद्रराव व शशीकला, नंतर विष्णुपंत व हणमंतराव, माधवराव व यमूताई असें अनुक्रमे येतात व अखेर शवटी त्रिंबकराव व लक्ष्मीबाई येतात. नव-वधू-वरे उभयतां त्यांच्या पायांवर डोकीं ठेवतात. मागाहून मिनाक्षी व बळवंतराव येतात.]

हणमंत०—कां त्रिंबकराव. तुम्ही तर प्रथम यायचें पण अखेर येतां आहां.

त्रिंबक०—वा! आम्ही तुमच्याप्रमाणेच विमल-वामनरावाकडे पाहुणे म्हणून आलों आहोंत.

विष्णु०—असें कसें म्हणून चालेल?

त्रिंबक०—कां बरें?

**वामन**०—बरें मंडळी प्रथम चहा घ्यावयाचा. मग थोडा करमणुकीचा कार्यक्रम नंतर उपहार व अखेर विचार विनिमय, असा कार्यक्रम आम्ही ठरविला आहे.

**सर्वजण**०—वा! ठीक आहे.

[ सर्वांस चहा देतात. ]

**विमल**०—आतां इंग्रजी पद्धतीचा नाच होईल.

[ इंग्रजी पोषाख केलेली एक स्त्री व एक पुरुष सुदर नाच करून दाखवितात. ] ( वाद्यांचा ठेका असतो. )

**सर्वमंडळी**०—वा! वा! करून माना डोलवितात.

**विमल**०—आतां देशी फुगड्या व झिम्मा होईल.

[ राधा मोलकरीण व गोविंदा गडी पुढे येऊन फुगडी घालतात. ]

फुगडी घालतांना राधा पुढीलप्रमाणें गाणें म्हणते:—

सर सर गोविंद येतोग
मजवर गुलाल फेंकितो
त्याच्या गुलालाचा मार
माझी वेणी झाली लाल
यशोदेला जाऊन सांग कृष्ण फुगडी घालीतो
पक्का घालते.

दुसरी फुगडी:—ऑवा बाई ऑवा।
रानोमाळी ऑवा।
माझ्याशीं फुगडी खेळतो।
गोविंदबोवा॥

तिसरी फुगडी:—दारीं होती केळ तिला मारला धपाटा।
डॉक्टरांनी बायको केली लवंगी फटाका॥

[ सर्वजण हंसतात. ]

**त्रिंबक०**—हा देशी कार्यक्रम स्वतः सुशिक्षित स्त्री पुरुषांनीं अमलांत आणावा म्हणून दाखविला आहे असें दिसतें; त्याला हवेतर Refined स्वरूप द्यावें.

**बामन०**—आतां कुमार रघूचें थोडें गाणें होईल.

[ रघूचे वय नऊ वर्षे. ]

गाणें पहिलें.

रघुवीर तुमको ऽ मेरी लाज ।
  सदा सदा मै शरन तिहारो ।
तुम बडे गरीब नो बाज ॥

गाणें दुसरें,

प्रीत रीत रघुराई हो जानत ।
  होनाते सब हाते कर राखे ।
राम सनेह सगाई ॥ प्रीत रीत रघुराई ॥

गाणें तिसरें.

तोम् तनननननन वेणू।
  धृत बल रामानुज भानू ।
यांतटी ब्रिज धेनू ।
  चारिती जोंवरी घडी घोंगडी शिरी ।
वंदिती सुरनर पदाब्ज रेणू वेणू ॥ तोम् तनन ॥

[ उपहार होऊन पानसुपारी अत्तरगुलाब झाल्यावर सर्वमंडळी जातात. ]

# अंक पांचवा.

## प्रवेश पांचवा.

[ वेळ नऊ वाजण्याची. यमूताई झकपक पोषाख करून माधवरावांची वाट पहात दारांशीं उभ्या आहेत. माधवराव येतात. ]

**माधव०**—कां आटोपलें कां ? हीं फुलें घ्या. रामू निजला कां ?

**यमु०**—रामू केव्हांच निजला.

[ यमुताई फुलें घेऊन त्यातील वेणीची पुडी उघडते व तिचा दोरा वगैरे नीट आहे कीं नाहीं हें पाहते व आरशापुढे उभे राहून डोक्यांतवेणी घालते. दोरा तोकडा असल्यामुळे की काय गांठ नीट बसत नाही. ]

**यमु०**—ही एवढी वेणीची गांठ मारायची हां ? हे फूलवाले तर भारीच लहान सूत वापरतात वेण्यांना.

**माधव०**—अहो, ही उद्याकरितां वेणी ठेवून द्यायची. रात्रीं चुरगळून जाईल ना ?

**यमु०**—(आरशापुढें तशीच उभी राहून) आधीं ही गांठ मारतां कीं नाहीं ?

[ पदर एका खांद्यावर टाकून आरशासमोर उभी राहते. माधवराव वेणी बांधतो व XXX घेतो. ]

**यमु०**—इश्श ? आतां लहान कां वय आहे ? हें बरं दिसतं ?

**माधव०**—अहो, हें दुसरेपणाचें लग्न. दुसऱ्या लग्नानंतर पुरुष अर्धाकच उल्लू बनतो खरें ना ? खरी नवलाई आजपासूनच, होऊन गेलं तें पाहिलं लग्न.

यमू०—म्हणजे? तीस तीस वर्षांच्या कुमारिका देखील लग्नाच्या आहेत काय?

माधव०—आहेत तर. वीस तीस वर्षांच्या बायका झाल्या कीं मगच त्या खऱ्या वयांत येत असतात. पधरासोळा वर्षांच्या स्त्रियांचीं गर्भाधानें ही एकांगीं एकच बाजूची होतः आतां सईताईचें वय नाहीं का तिशीचें.

यमू०—बरें झालें बाई सईचें लग्न झालें तें. ती कुमारी असे तोपर्यंत माझ्या जिवाची धाक्‌धूक् राहती ना!

माधव०—झालें ना एकदां समाधानः तुमचा फराळ झाला कां?

यमू०—माझा फराळ केव्हांच रामूबरोबर झाला. आपण आतां फराळाला चलावें.

[ माधवराव फराळाला बसतों. ]

यमु०—कसा काय आजचा व्यापारधंदा? आतां फक्त आनंदाची बाजू सांगायची. सकाळच्या चहाचे वेळेला मग संकटं अडचणी सांगाव्या.

माधव०—म्हणजे काय? खरं सांगू? आज सर्वत्र आनंदी आनंद. आज पांचशे रुपये एकाकडून एकदम आले. पण पहांटे अडचणी सांगायच्या हें काय?

यमू०—असा एक नवीन ठराव आमच्या बायकांच्या धूम्र-पान क्लबांत पास झाला आहे कीं दिवसाचे दोन भाग. पहाटे पांच पासून संध्याकाळीं सातपर्यंत एक भाग आणि रात्रीं आठ वाजलेपासून पुढें चार

वाजेपर्यंतचा दुसरा भाग. सरकारी बेलीफ सुद्धां रात्रीं सात वाजलेनंतर जप्ती आणीत नाहींत. रात्रीं चर्चा फक्त आनंदाची. दिवसां पतिपत्नींत भांडण झालें तरी तें रात्रीं आठपासून दुसऱ्या सकाळपर्यंत विसरलें पाहिजे. अगदीं भारतीय युद्धा-पासून चालत आलेला हा नियम न पाळल्यामुळें कित्येक कुटुंबें दु:खी झाली आहेत; या रात्रीच्या दु:खदसंवादामुळें कित्येक स्त्रियांची आयुष्यें रखरखीत वाळवंटें बनलीं आहेत हे पुष्कळांना माहीत नसेल.

[ फराळ चालू असतां ती एकदोन पदे पेटीवर वाजविते. त्यानंतर ती अंतर्गृहांत जाऊन एक झिरझिरीत शुभ्र पातळ नेसून येते व विडा देते. तिला जवळ घेऊन. ]

**माधव**०—यमू ! अहाहा, यमू, खऱ्या आनंदानें सहजच 'यमू' असा उद्गार आज बारा वर्षांनीं बाहेर पडत आहे. आज तुझ्यांत मूर्तिमंत रतीनें प्रवेश केला आहे.

**यमू**०—विमल व डॉ. वामनरांचा जोडा कसा अगदीं लक्ष्मी नारायणासारखा दिसतो नाहीं !

**माधव**०—होय. तीं दोघेंहीं अनुरूपच आहेत. विमल परीस आहे.

**यमु**०—म्हणजे ! मी लोखंड ! असंच कीं नाहीं.

**माधव**०—पण परिसामुळें त्या लोखंडाचें सोनं झालं असं मीच कबूल करीत आहे ना ?

[ एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून ]

यमू०—खरेंच !

माधव०—आज आनंदाचा कडेलोट झाला ! आयुष्यांत विशेषतः विवाहित आयुष्यांत गरीबींत सुद्धां मजा आहे. पण केव्हां ? आमच्यासारख्या मध्यम स्थितींतील पुरुषांच्या स्त्रिया जर हा धडा समजून घेतील तर विवाहित पुरुषच पण्यांगनांच्या माड्या अधिकच चढतात प्रवाद साफ खोटा ठरेल. बस्स ! आतां दिव सपाटून काम करावयास हरकत नाहीं आल्यावर अशी मजा व तिकडे —

यमू०—परमेश्वरा ! इतक
सांगता येत नाहीं. बायांनीं रा
ठेवलात तर दुसऱ्या दिवशीं त्यांना
कांहींच आवडणार नाहीं. आणि भ
संभाळलीत म्हणजे तुमचा शब्द प
केव्हांहीं मोडणार नाहीं हे खास
संभाळा. पतीच्या चिडक्या स्व
मूर्खपणाच कारण होतो हें लक्षांत घ्या.
रहस्य म्हणजेच माझें स्वतःचें चरित्र
तुमचेपुढें ठेविलें आहे तें समजून

[ पडदा पडतो व राष्ट्रगीताकरितं

[ सर्वजण वंदेमातरम् हें राष्ट्र

( राष्ट्रगीत )

वंदे ऽ ऽ मातरम् । वंदे ऽऽ मातरम् । वंदे ऽऽ मातरम् ।

सुजलाम् । सुफलाम् । मलयजशीतलाम् ।

सस्यशामलाम् । मातरम् ।

पम गरेग मप धप ।

धपम । धपम । रेग सारे सारेग सा ।

सारे मप ध । ध गोरेसा धसानीध पमग ॥

— वंदेमातरम् —

[ ५८३। पडनी. ]

समाप्त